# नवभारत

वर्ष ७ वें ] मार्च १९५४ [ अंक ६ वा



किंमत १ रुपया









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका














मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास






नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें | अंक सहावा

# नवभारत

मार्च १९५४

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत मासिक', ९०६ शिवाजी-नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )






# 'नवभारत' मासिक, मार्च १९५४

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय, या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे — का. सं. ]

**श्री. दि. के. बेडेकर** (पुणें) – महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध मार्क्सवादी विचारवन्त आणि साहित्यसमीक्षणकार. ' संयुक्त महाराष्ट्र ', ' सोव्हिएट राष्ट्रें व लोक ' या त्यांच्या पुस्तकांनन्तर, त्यांचें " साहित्यः निर्मिति व समीक्षा " हें पुस्तक नुकतेंच गेल्या महिन्यांत प्रकाशित झालें आहे.

**श्री. श्री. वि. हर्षे** एम्. ए. – ( मुंबई ) – तत्त्वज्ञान व वाङ्मय यांचे व्यासंगी. 'दृष्टीआड' या नाटकाचे लेखक.

**(कै.). शं. रा. देशमुख** एम्. एस्सी. एल्. टी. – आर्वी ( म. प्र. ) च्या म्युनिसिपल हायस्कूलचे मुख्याध्यापक होते. मृत्युः २७ ऑगस्ट १९४८.

**प्रा. वा. कृ. कोठुरकर** बी. ए. ( केंब्रिज ), एम्. ए. ( मुंबई ) – पुणें विद्यापीठांतील मानसशास्त्राचे प्राध्यापक व प्रायोगिक मानसशास्त्रशाखेचे प्रमुख.

**प्रा. सौ. शरयू बाळ** एम्. ए. बी. टी. – पुणें येथील ना. दा. ठाकरसी वुमेन्स कॉलेजच्या प्राचार्य. ' मानसशास्त्र प्रवेश ' या पुस्तकाच्या लेखिका.

**प्रा. म. गं. नातू** एम्. ए. – अमरावती येथील विदर्भ महाविद्यालयांत मराठीच्या प्राध्यापिका.

**श्री. शा. म. जोशी** एम्. कॉम्. – पुणें येथील ' दि साठे बिस्किट अ‍ॅन्ड् चाकोलेट कंपनी ' मध्यें अकाउंटंट.

**श्री. भा. रं. कुलकर्णी** बी. ए. – धुळें येथील 'राजवाडे संशोधनमंडळा'चे क्यूरेटर. 'अहिराणी भाषा व संस्कृति ', ' ऋग्वेदांतील ज्योतिषमूलक कालनिर्णायक गमकें ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**डॉ. दि. धों. कर्वे** एम्. एस्सी. पीएच्. डी – पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य आणि रसायनशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. दे. द. वाडेकर** – पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें व पुणें विद्यापीठांत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. ' आधुनिक मानसशास्त्र : इतिहास व संप्रदाय ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

---

चुकीची दुरुस्तीः– ' नवभारता'च्या गेल्या फेब्रुवारीच्या अंकांत– (१) ' नव्या अस्त्राची चाहूल ' या लेखांत पान २४ वर पहिल्या स्तंभांत, वरून १८ व्या ओळींत आरंभीं ' $४.५ \times १०$ ' ऐवजीं ' $४.५ \times १०^{२३}$ ' असें वाचावें. (२) तसेंच ' वाचनसुलभतेचें मापन ' या लेखांत पान ६२ वर पहिल्या स्तंभांत वरून २५ व्या ओळींत ' उंदीर-नवरा' ( बालवाङ्मयमाला ) १९ ' या ऐवजीं ' उंदीर-नवरा ' ( बालवाङ्मयमाला ) ९१ ' वाचावें.

अनुक्रमणिका

श्री. दि. के. बेडेकर

# ग्रामसंस्था व सांख्यदर्शनांतील 'प्रकृति'

इंग्रजी राजवटीच्या आधींचा भारतीय समाज स्थिर ग्रामसंस्था आणि तरंगती राजसत्ता यांच्या दुहेरी पायांवर आधारलेला होता, ही गोष्ट आपल्याकडील अनेक विद्वानांनीं मांडलेली आहे व आपल्या हिंदुस्थान-विषयक लेखांत, मार्क्सनेंहि ती मांडलेली आढळते. या मूलभूत तत्त्वाच्या अनुषंगानें भारतीय तत्त्वज्ञानांतील प्रमेयांचा अर्थ व अन्वय लागूं शकतो का? – ह्या प्रश्नाचें उत्तर नीट पुराव्यानिशीं द्यावयाचें तर वेद आणि उपनिषदें, बौद्ध व जैन दर्शनें आणि शंकराचार्य व रामानुजाचार्य यांच्यासारख्या प्रतिभावान् तत्त्वज्ञांचीं दर्शनें या सार्‍यांचा प्रथम गाढ व्यासंग करून मग शास्त्रीय पद्धतीनें निष्कर्ष काढले पाहिजेत. जगांतील विचारवंतांच्या आदराला पात्र ठरण्याइतकी तत्त्वचिंतनांतील व नीतिमीमांसेंतील सिद्धान्तांची श्रेष्ठ परंपरा आपल्याला लाभली आहे. तिचा नव्या दृष्टीनें विचार करतांना जर जुजबीपणा व ठोकळेबाज वृत्ति ठेवली तर त्यांत या परंपरेबद्दल अनादर ठेवल्याचा अपराध तर आपल्या हातून घडेलच, शिवाय खर्‍या शास्त्रीय ज्ञानाचीहि हानि होईल. वरील जाणीव मनांत बाळगून मी पुढील विवेचन केवळ प्राथमिक स्वरूपाचा प्रयत्न म्हणून मांडीत आहे.

## 'प्रकृति' म्हणजे निसर्ग नव्हे

सांख्य दर्शनामध्यें 'प्रकृति' व 'पुरुष' या दोन मुख्य कल्पना आहेत व त्यांचा विचार करतांना ग्रामसंस्था व राजसत्ता यांचा संबंध डोळ्यांसमोर उभा राहतो. सांख्यांची 'प्रकृति' म्हणजेच युरोपीय विचारवंतांनीं मानलेली 'सृष्टि' किंवा 'निसर्ग' होय अशी समजूत आपल्याकडे रूढ झालेली आहे. या समजुतीचा आशय असा कीं 'प्रकृती'च्या 'सत्त्व' 'रज' व 'तम' या तीन गुणांच्या कार्यामुळें 'गुणोत्कर्ष' होतो, म्हणजेच व्यक्त सृष्टि निर्माण होते. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश अशा पांच 'महाभूतां'ची बनलेली त्रिगुणात्मक 'प्रकृति' व आधुनिक विज्ञानानें मानलेली पदार्थसृष्टि एक होत असें पुष्कळदा प्रतिपादन केलेलें आढळतें. उदाहरणार्थ, 'गीता-रहस्या'मध्यें लोकमान्यांनीं प्रथम सांख्यदर्शनांतील गुणांच्या कार्याचें वर्णन करून निष्कर्ष काढला आहे कीं सांख्यांच्या "या म्हणण्यांत व उत्क्रांतिवादांत वस्तुतः कांहीं भेद नाहीं." (जानेवारी १९२६ ची आवृत्ति, पूर्वार्ध, पान १६९ पहा.)

पण थोडें खोलांत शिरलें तर असें स्पष्ट दिसूं लागतें कीं सांख्यदर्शनांतील 'प्रकृति' व आधुनिक विज्ञानांतील 'निसर्ग', 'पदार्थसृष्टि' किंवा 'मॅटर' यांच्यांत फारच थोडें साम्य आहे व तेंहि वरवरचें आहे. लाप्लास व डार्विन यांनीं विशद केलेला सृष्टींतील अचेतन व चेतन वस्तूंचा विकासक्रम (उत्क्रांति) व सांख्यांच्या 'प्रकृती'चा गुणोत्कर्ष यांत कांहींच साम्य नाहीं. 'गुणोत्कर्ष' ही कल्पनाच मुळांत सांख्यदर्शनांतील नाहीं. 'सत्त्व', 'रज' व 'तम' या गुणांपैकीं अमुक एका गुणाचा उत्कर्ष होतो असें प्रकृतिवादी मानीत नाहींत. ह्या तीन गुणांचा एकमेकांशीं जो संबंध कल्पिलेला आहे तो मोठा विलक्षण आहे. एखाद्या दिव्यामध्यें तेल, वात आणि ज्योत यांचा संबंध जसा एकजीव सहकार्याचा असतो तसा या तीन गुणांचा आपसांतील संबंध असतो असें सांख्यांचें मत आहे. या दिव्याच्या उपमेवरून आणि सांख्यशास्त्रांतील इतर स्पष्ट विधानांवरून असें दिसेल कीं आजच्या विज्ञानांतील विकासक्रमाशीं सांख्यांच्या गुणपरिणामवादाचें साम्य मानणें योग्य नाहीं.

प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम या गुणरूपी घटकांच्या कार्यामुळें परिणाम म्हणून एकीकडे महत्, अहंकार, मन, इंन्द्रियें, तन्मात्रे व पांच महाभूतें निर्माण होतात व दुसरीकडे या परिणामाबरोबरच धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य इत्यादि मुख्य आठ व इतर पन्नास 'भाव' निर्माण होतात. अशा तर्‍हेनें मूळ प्रकृतीमधूनच दोन 'सर्ग' निघतात हें सांख्यांचें म्हणणें नीट समजावून घेतलें पाहिजे. यांपैकीं 'महत्' पासून पुढील सर्व तत्त्वें हा एक सर्ग घेतला तर त्यांत नुसती पंचमहाभूतें नाहींत तर ज्यांना आपण आज मानसिक व्यापार किंवा त्यांना आवश्यक अशीं इंद्रियादि साधनें मानतों









अनुक्रमणिका

त्यांचाहि त्यांत समावेश आहे. दुसरा जो 'भाव'-सर्ग आहे तो तर उघडच जडसृष्टीपेक्षां भिन्न स्वरूपाचा आहे.

सारांश, प्रकृतीच्या सर्गाची व आधुनिक विज्ञानाच्या विकासक्रमाची कोणत्याहि अर्थानें सांगड घालणें बरोबर नाहीं. ह्या मुद्द्याचें एवढें स्पष्टीकरण करणें मला जरूर वाटलें, कारण मानवेंद्र रॉय व इतरहि विवेचकांनीं भारतीय तत्त्वज्ञानांतील जडवादी दर्शन म्हणून सांख्यांचा उल्लेख केलेला आढळतो व 'मटीरिॲलिझम्'साठीं 'भौतिकवाद' हा शब्दहि याच चूक कल्पनेमुळें रूढ झालेला दिसतो.

**'प्रकृती'च्या अचेतनत्वाचा अर्थ**

'प्रकृति' म्हणजे विज्ञानांतील 'मॅटर' नाहीं हें खरें. पण ती 'अचेतन' व 'जड' आहे असें मात्र सांख्य म्हणतात, त्याचा अर्थ काय? 'मॅटर'चें 'अचेतनत्व' किंवा 'जड'त्व हेंच जर प्रकृतींतहि आहे तर मग तिला 'मॅटर'हून वेगळी कां मानावी? निदान या दोन कल्पनांतील फरक मूलभूत कां मानावा?

वरील प्रश्नांचें उत्तर देण्यासाठीं सांख्यशास्त्रांतच दिलेली एक उपमा घेऊं. या उपमेप्रमाणें, 'प्रकृति' ही आंधळयासारखी आहे, तिला स्वतःच्या पायानें चालतां येतें पण दिसत नाहीं; आणि तिच्या पाठीवर एक लंगडा बसला आहे, त्याला दिसतें पण चालतां येत नाहीं; तोच 'पुरुष' होय. या अंध-पंगूंची जोडी जमली कीं दोघेहि वाट चालूं लागतात, – अर्थात् चालण्याचे श्रम आंधळा करतो व लंगडा वाट दाखवितो.

आतां 'प्रकृती'ला 'अचेतन' कां म्हटलें आहे तें नीट लक्षांत घेतां येईल. **'प्रकृति' आंधळी आहे म्हणून अचेतन आहे.** उलट, चालता न येणारा 'पुरुष' केवळ त्याला दिसतें म्हणून चेतन आहे. यावरून 'चेतन' व 'अचेतन' या शब्दांचा अभिप्रेत अर्थ थोडासा कळून येईल. पण तो स्पष्ट व्हावयाचा असेल तर सांख्यदर्शनांतील आणखी एका मुख्य बाबीचा उलगडा केला पाहिजे.

सांख्यांच्या मतें 'प्रकृती'चें जें सारें कर्तृत्व आहे तें 'पुरुषा'साठीं आहे; म्हणजे ती नुसती आंधळी नाहीं तर दुसऱ्याच्या भोगासाठीं धडपडणारी आहे. तिची वाटचाल होत आहे, ती पाठीवर बसलेल्या 'पुरुषा'-च्या अपेक्षेनें, म्हणजेच त्याच्या भोगासाठीं व मोक्षासाठीं होत आहे.

**उदासीन 'पुरुष'**

'प्रकृति' ही **आंधळेपणानें** परंतु अंगभूत गुणांच्या **कर्तृत्वामुळें** साऱ्या विश्वाचा पसारा मांडीत आहे व हें सारें 'पुरुषा'साठीं करीत आहे, हा सांख्यशास्त्राचा मुख्य सिद्धान्त झाला. पण आणखी एक गोष्ट तितकीच महत्त्वाची आहे. 'प्रकृति' कर्तृत्वशाली असून अचेतन आहे हें जसें एक 'कोडें', तसें दुसरें कोडें आहे तें म्हणजे 'पुरुष' चेतन असून अकर्ता व उदासीन आहे. 'पुरुष' हा 'प्रकृती'मधील घडामोडींना व सुखदुःखांना एका अर्थी निमित्त होतो; पण तो या सर्वांचा भोग घेऊनहि उदासीन व अकर्ताच राहतो.

याचा अर्थ असा कीं, 'प्रकृती'च्या कर्तृत्वामध्यें किंवा श्रमामध्यें प्रत्यक्ष भाग घेऊन या श्रमांना संघटित व डोळस करण्याचें कामहि उदासीन 'पुरुष' करीत नाहीं. नैवेद्य दाखविल्यावर त्याचा 'भोग घेणारी' देवता व हा उदासीन 'पुरुष' यांच्यांत साम्य आहे व यावरून 'पुरुषा'च्या सांख्यकल्पनेचा अर्थ स्पष्ट होईल.

परंतु जरी तो उदासीन असला तरी ह्या पुरुषासाठींच 'प्रकृती'चा व्यापार घडतो ही गोष्ट सांख्यमतांत मुख्यतः सांगितलेली आहे. आणि 'प्रकृती'चा हा परावलंबीपणा मानूनहि तिला अनादि म्हटलें आहे. 'प्रकृती'च्या सर्गामध्यें 'महत्' इत्यादि जे परिणाम जन्मतात ते शेवटीं प्रलयामध्यें नष्ट होतात. पण अशा महासर्गांच्या व महाप्रलयांच्या तरंगांना सामावून अखंड नांदणारी 'प्रकृती'च सांख्यांनीं मूल-प्रकृति या नांवानें गौरविली आहे.

सांख्यवादाचें स्वरूप येथवर जें मांडलें आहे तें ढोबळ आहे खरें, पण आपल्या पुढील विवेचनासाठीं तें पुरेसें आहे.

**राजा, प्रधान, पाटील, कमाविसदार व शेतकरी**

सांख्यदर्शनामध्यें 'प्रकृति' व 'पुरुष' यांचें द्वैत हें प्रामुख्यानें मांडलें असून या दोन तत्त्वांचा संयोग होण्यानेंच एकीकडे विश्वाचा पसारा निर्माण होतो व दुसरीकडे 'पुरुषा'ला भोग व मोक्ष साधतां येतो असें मानलेलें आहे. ही गोष्ट स्पष्ट करतांना सांख्यकारिकांवर टीका लिहिणारे वाचस्पतिमिश्र यांनीं








दिलेली एक उपमा मोठी सूचक आहे. तिचा थोडा तपशिलांत शिरून विचार करूं. इंद्रियें, मन, अहंकार व बुद्धि यांच्या मार्गानें सर्व वस्तूंचें ग्रहण करून त्यांचा भोग ( नैवेद्य ) ' पुरुषा'ला दिला जातो ही गोष्ट ' सांख्यकारिकें'तील ३६ व्या कारिकेंत सांगितली आहे. तिचा अर्थ विशद करतांना वाचस्पति म्हणतात कीं, इंद्रियें ही शेतकऱ्यांप्रमाणें सर्व वस्तूंशीं समरस होऊन त्यांचें ग्रहण करतात. मग पाटील शेतकऱ्यांकडून सारा वसूल करतो, त्याप्रमाणें मन हें त्या ग्रहण केलेल्या वस्तूंचा एक भाग संकल्परूपानें उचलतें; नंतर राजाचा प्रतिनिधि असलेला ' विषयाध्यक्ष ', म्हणजे कमाविसदार, तो सारा सरकारी कोठारांत पोचवितो त्याप्रमाणें ' अहंकार ' हा ग्रहण केलेल्या वस्तूंवर स्वामित्वाचा ( अस्मितेचा ) शिक्कामोर्तब करतो; शेवटीं ह्या कोठारांतील सारा राजाच्या प्रधानाकडे ( ' सर्वाध्यक्षा'कडे ) जाऊन मुख्य खजिन्यांत जमा होतो, त्याप्रमाणें ग्रहण केलेल्या व स्वामित्वानें आत्मसात् झालेल्या वस्तूंचा विचार करून त्यांचा अमुक तऱ्हेनें व्यय करण्याचा निश्चय ' बुद्धि ' करते. ह्या व्ययामुळें राजाचें राज्य चालतें, सैन्य पोसतें व एकंदर कारभार बिनबोभाट चालतो. अर्थात् प्रधानाचें कार्य हें शेवटीं राजाच्या भोगालाच उपयोगी पडते व म्हणून शेवटीं वरील चार पायऱ्यांनीं होणारा व्यवहार हा राजाच्यासाठींच घडतो.

वरील रूपकामध्यें पाटलाला म्हणजे राजाचा नोकर नसून शेतकऱ्यांचा परंपरागत पुढारी असलेल्या वतनदाराला राजभोगासाठीं होणाऱ्या व्यवहाराच्या दावणींत घातलें आहे व देशमुख ह्या वरिष्ठ वतनदाराच्या अस्तित्वाचा उल्लेख केलेला नाहीं. याचें कारणहि उघड आहे कीं शेतकरी व राजा यांचा संबंध फक्त राजभोगाच्या चष्म्यांतून रूपककारानें पाहिला आहे. देशकारभार व राज्यकारभार असा दुहेरीपणा वास्तवांत असून त्यानें फक्त एकेरी व्यवहार वर्णन केला आहे.

## " रावो पहुडलिया सुखें "

आपल्या दृष्टीनें अर्थात् ही एकेरी श्रेणी किंवा मांडणी पुरेशी अर्थवाहक आहे. या रूपकाच्या आधारानें ' प्रकृति ' व ' पुरुष ' यांच्या द्वैताकडे पुन्हा पाहिलें तर कांहीं नवीन गोष्टी दृष्टीस पडतात. इंद्रियें, मन, अस्मिता व कर्तव्यनिश्चय करणारी बुद्धि या चारी अनुभूतींचा ( बौद्धिक व्यापारांचा ) व त्यांचेच विषय असणाऱ्या बाह्य सृष्टींतील गोष्टींचा समावेश ' प्रकृति ' या मोठ्या तत्त्वांत सांख्यांनीं केला आहे हें आपण पूर्वींच पाहिलें आहे. या ' प्रकृती'च्या पदरीं अचेतनत्व आणि कर्तृत्व असे परस्परविरोधी भासणारे गुण कां बांधण्यांत आले तें आतां कळूं शकेल. शेतकऱ्यानें कितीहि श्रम केले तरी शेवटीं राजाच्या दृष्टीनें त्या श्रमांचा अर्थ एवढाच कीं, त्याचा भोग ( सारा ) त्याला ( राजाला ) मिळाला पाहिजे. प्रधानाची देखील तीच गोष्ट ! त्याच्या मुत्सद्देगिरीमुळें किंवा सेनापतीच्या ( व सैनिकांच्या ) शौर्यामुळें खजिना समृद्ध झाला किंवा मुलूख मिळाला तरी तें सर्व राजाच्या वैभवाला व कीर्तीला वाढवितें. म्हणजेच प्रधानाचें, सेनापतीचें व इतरांचेंहि कर्तृत्व राजासाठीं, ( परार्थ ) असतें.

पण, या भोगाला दुसरी बाजू आहे ! सारावसुलीपासून लढाया मारण्यापर्यंतची सारीं धडपड इतरांनीं केली तरी ही उदंड ' राजकारणें ' घडूनहि त्यांत राजाला हातपाय हलवावे लागलेले नसतातच. ' परी रावो पहुडलिया सुखें । जैसा देशींचा व्यापारू न ठके । प्रजा आपुलालेनि अभिलाखें । करितचि असती ॥ ' ( ज्ञानेश्वरी. अ. ८ ओ. १८३ ) — या ओळींत हा प्रकार थोडक्यांत पण स्वच्छ वर्णन केलेला आहे. सारांश राजा हा भोगाचा स्वामी आहे पण अकर्ता आहे. हेंच औदासीन्य सांख्यांच्या ' पुरुषा'च्या अंगीं बाणलेलें आहे. गडकरी म्हणतात कीं राजा हा " जगाचा भोगशून्य स्वामी " आहे. पण ही आमची परंपरागत कल्पना नसून परकी कल्पना आहे. आमचा राजा हा तत्त्वतः ' कर्तृत्वशून्य भोगस्वामी ' आहे. सांख्यदर्शनासारख्या सर्वगामी प्रभाव पाडणाऱ्या दर्शनावरून, आमची मूळ तात्त्विक धारणा वरीलप्रमाणें आहे, असा अंदाज करतां येतो.

## प्रजापालनाचा राजधर्म

राजा हा एकंदर समाजाच्या, म्हणजे ग्रामसंस्था, वतनसंस्था, नगरसंस्था, चातुर्वर्ण्य इत्यादि संस्थांच्या शिरोभागीं पण अलिप्त आहे ही कल्पना ' उदासीन ' या शब्दांतच चांगली स्पष्ट होते. कारण ' उत् ' म्हणजे बाहेर किंवा वर असणें हाच त्या शब्दाचा मूळ अर्थ

आहे. अर्थात्, असें उदासीन जीवन राजाचें नसावें, उलट, त्यानें आपल्या प्रजेच्या रक्षण-भरण-पोषणासाठीं झटावें ही कल्पना भारतीय राज्यशास्त्रांत मांडलेली नाहीं असें नाहीं. कौटिल्याचें ' अथशास्त्र ' हा आमचा राज्यशास्त्रावरील मोठा ग्रंथ असून त्यांत कर्तृत्वशाली राजाचें महत्त्वच वर्णन केलें आहे. तसेंच ' राजा कालस्य कारणम् ' हें वचन प्रसिद्ध असून कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें ( रघुवंश. १. २४ )

' प्रजानाम् विनयाधानात् रक्षणात् भरणात् अपि
स पिता पितरः तासाम् केवलम् जन्महेतवः ॥ '

अशा प्रजावत्सल राजांचा आदर्श आपल्याकडे निर्माण झालेला होता यांत शंका नाहीं. ' धारणात् धर्मः ' अशी धर्माची व्याख्या असली तरी ' बले प्रतिष्ठितो धर्मः ' असेंहि म्हटलेलें आहे आणि बलाचें किंवा राजदंडाचें धारण करणारा राजा हा साक्षात् विष्णूच मानला आहे. राजाचें हें कर्तृत्वशाली व अत्युच्च स्थान कौटिल्याच्या आधींच्या व नंतरच्या मनु व नारद प्रभृति कांहीं राजनीतिशास्त्रज्ञांनीं मानलेलें आहे खरें, पण धर्मापेक्षां राजप्रभुत्वाला वरचढ मानणाऱ्या या ' अर्थशास्त्रीय ' राजधर्माची प्रेरणा अलेक्झांडरच्या स्वारीनंतर परिचित झालेल्या पर्शियन व ग्रीक राजसत्तेच्या कल्पनेवरून घेतलेली दिसते व तिला भारतीय राज्यशास्त्रांत एक दुय्यम स्थान आहे असा सिद्धान्त प्रख्यात पुरातत्त्व-पंडित नीळकंठशास्त्री यांनीं मांडला आहे [ भांडारकर प्राच्य – विद्यासंशोधनमंदिरपत्रिका, खड २८ ( १९४७ ) पानें ८३-९५ पहा. ] कौटिल्य, कालिदास किंवा इतरहि अनेक शास्त्रज्ञांनीं व कवींनीं राजाच्या पदरीं औदासीन्य न बांधतां त्याला प्रजावत्सल कार्यप्रवृत्त शास्त्याचें रूप दिलें आहे याचा अर्थ मी असा घेतों कीं भारतीयांच्या मूळ राज्यशास्त्रीय विचारप्रणालींत दुसराहि एक विचारप्रवाह मिसळला होता व त्याचें अस्तित्व नाकारून चालणार नाहीं. हा विचारप्रवाह आगंतुक व क्षीण होता ही गोष्ट वस्तुतः स्पष्ट आहे. परंतु इंग्रजांनीं भारतीय संस्कृतीला मागासलेली ठरविण्याचा जो प्रयत्न केला त्याला प्रत्युत्तर देतांना आमच्या पंडितांनीं असा अभिनिवेश धरला कीं भारतीय राजनीतीमध्यें लोकशाही, नियुक्त राजपद, प्रजावत्सल राजधर्म वगैरे सर्वच कांहीं तत्त्वें आहेत ! त्या अभिनिवेशाच्या जागीं वस्तुनिष्ठा व साक्षेप यांचा अवलंब करून आमच्या राजनीति-तत्त्वाचें पुन्हा मोजमाप होणें जरूर आहे. तूर्त प्रजावत्सल राजधर्माची कल्पनाहि आपल्याकडे होती, व रामचंद्र, दिलीप, शिवाजीराजे प्रभृति आदर्श राजपुरुष येथें नांदले, हें मान्य करूनहि **मूळ परंपरा उदासीन राजपुरुषाचीच** आहे व ती **अखंड व प्रभावी दिसते** एवढेंच प्रस्तुत विवेचनांत मी ठळकपणें नजरेस आणीत आहे.

सांख्य तत्त्वज्ञानांत क्रियाशील गणलेला ग्रामसंस्थेच्या कोषांतील हा समाज इतिहासांत कोठेंहि स्वतंत्रपणें कर्तृत्व गाजवीत नाहीं. परकीयांनीं आक्रमणें केलीं, देवळें लुटलीं व शहरें बेचिराख केली तरी समाज हललेला दिसत नाहीं. जो प्रतिकार दिसतो तो राजांनीं व नागर-परिसरांत वाढलेल्या संतांनीं केलेला दिसतो. तेव्हां आधुनिक अर्थानें ग्रामीण समाज उदासीन ठरतो व नागर-जीवनच कर्तृत्वशाली दिसते. पण तत्त्वज्ञानामध्यें नेमकी उलटापालट झालेली आहे ! वरील ऐतिहासिक घटनेच्या रूपानें व्यक्त होणारें भारतीय समाजाचें स्वरूप बरवरचें असून त्याचें खरें अंतरंग तत्त्वचिन्तनाच्या आरशांतच जास्त स्पष्ट प्रतिबिंबित झालें आहे असा याचा अर्थ आहे.

### ग्रामसंस्थेची स्वयंपूर्णता

राजा, त्याचे नोकर व आश्रित आणि इतर सारी प्रभावळ यांना आपण राजमंडळ असें नांव देऊं. या राजमंडळाचें राजधानीतलें जीवन हें एका अर्थानें ' चेतन ' म्हणजे अखंड जागरूकतेचें असणें प्राप्त आहे. परचक्राची व अंतःस्थ कारस्थानाची भीति राजाला एकसारखी भेडसावीत असे. त्याचप्रमाणें आपल्या पराक्रमानें इतरांना पादाक्रांत करून सम्राट्पद बळकाविण्याची ईर्षा त्याला वाळगतां येई. शेतकऱ्यांकडून घेतलेला सारा ( ज्याला ' भोग ' असेंच पूर्वीचें नांव आहे ), हा राजमंडळाच्या निर्वाहाचा आधार होता व या दृष्टीनें तें बांडगुळासारखें परोपजीवी होतें; पण महत्त्वाकांक्षा व विजिगीषा फक्त त्यालाच शक्य होती. उलट पक्षीं, शेतकऱ्यांच्या जीवनाचा कोष असलेली ग्रामसंस्था म्हणजे एक अगतिक, स्थिर व स्वयंपूर्ण अवस्था होती. या कोषांतच भारतीय जातिव्यवस्था व कुटुंबव्यवस्था शतकानुशतकें अबाधित राहिली. कर्मवादाचें तत्त्व आणि जन्मसिद्ध जातींमुळें व कौटुंबिक








जबाबदारीमुळें प्राप्त होणाऱ्या कर्माचें आचरण बिनबोभाट करण्याचें कर्मयोगी नीतिशास्त्र या कोषांतच टिकून राहिलें. बुद्धापासून एकनाथांपर्यंत अनेक अलौकिक प्रतिभेच्या धर्मप्रवर्तकांनीं व सुधारकांनीं केलेली धडपड पाण्यावर काढलेल्या रेघोट्यांप्रमाणें विफल ठरली! कारण, ही धडपड नागरप्रेरणेंतून निघालेली व म्हणूनच तितकीच निष्प्रभ होती. नागर जीवनाची ग्रामसंस्थेंत बदल घडवून आणण्याची शक्ति किती तोकडी होती हें यावरून आपल्याला दिसूं शकतें.

ग्रामसंस्थेच्या या स्वयंपूर्ण व स्थिर जीवनाचें रहस्य त्या संस्थेच्या अंतर्गत श्रमविभागामध्यें सांठविलेलें आहे. श्रमांची किंवा **प्रत्यक्ष वस्तूंची** देवघेव करून या संस्थेतील सारे घटक जगत होते. पैसा ही चीज या अंतर्गत व्यवहारांत अनावश्यक होती व म्हणून तिचा अभावहि होता. राजाचा सारा देखील धान्याच्या प्रत्यक्ष रूपांतच दिला जात होता. गांवांत न पैदा होणाऱ्या थोड्याफार वस्तूंसाठीं आजच्यासारखी बाजारपेठ नव्हती. परंपरागत पद्धतीनें भरणाऱ्या जत्रांतून या वस्तूंची प्रत्यक्ष देवघेव होत असे. त्यामुळें देवघेवीचा समावेशहि ग्रामसंस्थेच्या कोषांतच होत होता. सारांश, समुद्र ज्याप्रमाणें अथांग व अफाट पसरलेला असूनहि आपल्या मर्यादा सोडून मागेंपुढें जाऊं शकत नाहीं त्याप्रमाणें भारतीय ग्रामसंस्थादेखील आपल्या स्वयंपूर्ण जीवनाच्या मर्यादा सोडून बदलत नव्हती. या स्थिर समुद्रावर नागरजीवनाचीं व राजमंडळांचीं जहाजें तरंगत रहात होतीं.

## तीन 'गुणां'चा अर्थ

या ग्रामसंस्थेचेंच प्रतिबिंब आपल्याला सांख्यदर्शनांतील 'प्रकृती'मध्यें पहावयास मिळतें. खालीं धरती आणि वर प्रकाश देणारा सूर्य व पाऊस देणारे मेघ व **यांच्यामध्यें** नांगरणारा, पेरणारा व अन्न पिकविणारा शेतकरी या तीन घटकांच्या आधारावर ग्रामजीवनाचें चक्र अखंड फिरत राहतें. त्याचप्रमाणें खालीं 'तम' आणि वर 'सत्त्व' व यांच्यामध्यें 'रज' या तीन 'गुणां'च्या सहयोगावर प्रकृतीचा सर्ग अखंड चालू राहतो. धरती, प्रकाश व श्रमणारा मनुष्य या तीन घटकांच्या सहयोगानें मनुष्याच्या कृषिजीवनाला साफल्य येऊं शकतें व ह्या सहयोगाचें तत्त्व प्राचीन कृषिप्रधान समाजाच्या मनांत खोलवर बिंबलेलें असणें साहजिक आहे. म्हणूनच या तीन घटकांचा अनुक्रमें 'तम', 'सत्त्व' व 'रज' या प्रकृतीच्या गुणांशीं अन्वय लावणें योग्य ठरेल. या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं 'सत्त्वा'दि गुण हे मराठींत गुण म्हणतात तसे वस्तूंचे गुण नाहींत. या मराठी अर्थासाठीं, पूर्वीं 'धर्म' हा शब्द वापरीत व आपणहि 'गुणधर्म' असें म्हणतांना 'गुण' व 'धर्म' यांतील फरकच नकळत मांडीत असतों. मग 'गुण' म्हणजे काय? तर प्राणरूप व शक्तिरूप असलेले घटक होत. सांख्यदर्शनांतील 'गुण' या कल्पनेच्या उगमाबद्दल व निश्चित आशयाबद्दल पंडितांमध्यें मतभेद आहेत. पण एक गोष्ट सर्वमान्य आहे कीं 'सत्त्वा'दि 'गुण' हे मुळांत विश्वाचे शक्तिरूप घटक आहेत. त्यांच्यापैकीं 'सत्त्व' (प्रकाश) व 'तम' (नियम किंवा बंधकत्व) ह्यांचा अर्थ नीट कळण्यासाठीं 'रजोगुणा'चा अर्थ प्रथम लक्षांत घेतला पाहिजे. 'रजोगुण' म्हणजे प्रवृत्ति होय व त्याच्यामुळें 'सत्त्व' आणि 'तम' या दोन्ही गुणांना चालना मिळते असें स्पष्टीकरण वाचस्पतिमिश्रांनीं दिलें आहे. 'रज' हा स्वतःच 'चल' व 'उपष्टम्भक' असतो म्हणजे इकडेतिकडे हलूं शकतो व इतरांना उत्साहित व कार्यक्षम करूं शकतो. याचाच अर्थ 'रजोगुण' ही मनुष्याची श्रमव्यापाराच्या शक्तीसारखी परंतु एक विश्वात्मक शक्ति आहे असा घेणें शक्य आहे. मातीमध्यें बीज रुजूं शकतें व आकाशांतून येणाऱ्या उन्हामुळें व पावसामुळें उगवून फोफावूं शकतें; पण त्यासाठीं प्रवृत्तीचा, म्हणजे शेतकऱ्याच्या श्रमाचा दुवा हवा. नाहींतर, बीज मातींतच गाडलेलें राहील व प्रकाश व पाणी नुसतीं वांया जातील. दिव्यांतील तेल, वात व प्रकाश याप्रमाणें परस्परसंयोगानें सफल होणाऱ्या तीन गुणांचा अन्वय वरील प्रकारानें लावल्यास नीट लागूं शकतो, असें मला वाटतें.

सांख्यांनीं प्रकृतीला अनादि व स्वयंभू मानलें आहे. पृथ्वी, आकाश व कृषिव्यवसाय यावर आधारलेली ग्रामसंस्था कोणी कधीं निर्माण केली हें सांगणें कठीण आहे. प्राचीन काळीं तिला अनादि व स्वयंभू समजत असल्यास नवल नाहीं. ग्रामसंस्थेप्रमाणेंच प्रकृतीहि अनादि आहे असें सांख्यशास्त्रकारांना भासलें तेंहि साहजिक होतें. आजहि ग्रामसंस्थेच्या उगमाचा








शोध नीट लागला नसून या संस्थेच्या आधीं एक वन्य समूहावस्था मानवजातीनें भोगली आहे एवढेंच अनुमान शास्त्राला करतां आलें आहे.

### गुलामगिरीचा अभाव

भारतीय तत्त्वज्ञानामधील रामानुजदर्शनासारख्या अलीकडच्या दर्शनांतहि **इंद्रियग्राह्य व प्रत्यक्ष अशा 'सामान्या'**चें म्हणजे सर्व मनुष्यांमध्यें असणारें 'मनुष्य-पण' अशा 'जाति'-कल्पनेचें तत्त्व मांडलेलें आढळतें. कारण, येथील एकंदर समाजजीवनावर ग्राम-संस्थेचीच छाप होती व या संस्थेंतील अंतर्गत व्यवहार **हा प्रत्यक्ष देवघेवीच्या** स्वरूपाचा होता ही गोष्ट मी पुढील एका लेखांत स्वतंत्र मांडणार आहे. पण 'जाति'कल्पना, 'प्रकृति'-कल्पना किंवा 'उदासीन' पुरुषांची कल्पना या व अशा अनेक तत्त्वज्ञानात्मक प्रमेयांवरून आपल्याला एकाच निष्कर्षाकडे वळावें लागतें. तो असा कीं भारतीय समाजाची मूलभूत घडण स्थिर व स्वयंपूर्ण ग्रामसंस्था व तिनें दिलेल्या भोगावर तगलेली अस्थिर पण संकोच-विकासक्षम राजसत्ता या दोन घटकांच्या द्वंद्वावर आधारलेली होती.

भारतीय समाजव्यवस्थेची ग्रीक समाजाशीं ढोबळ तुलना केली तरी ही गोष्ट अगदीं ठळकपणें उमगून येईल. ग्रीक समाज हा मूलतःच नागरसमाज होता व पैसा, व्यापार आणि बाजारपेठ यांच्या भोंवऱ्यांत सांपडलेला होता. तेथें स्वयंपूर्ण ग्रामसंस्था नसून स्वतंत्र नगरराज्यें होतीं. त्या राज्यांत मूठभर नागरिकांच्या अन्नवस्त्रादि सर्वच गरजा भागविण्यासाठीं गुलामांचा प्रचंड वर्गच एकसारखा राबत होता. **गुलामगिरीवर ग्रीक समाज आधारलेला होता म्हणजे एकीकडे श्रमाचा सर्वच वांटा गुलामांकडे होता, दुसरीकडे नागरिकांकडे श्रमनियंत्रणाचें, लढण्याचें, व्यापाराचें, राजकारणाचें आणि कला, तत्त्वज्ञान इत्यादि बौद्धिक श्रमांचें काम उरलेलें होतें.** श्रमणारें शरीर (गुलाम) व त्याला चालविणारी प्रज्ञा (नागरिक) ह्यांची स्पष्ट आंखीव विभागणी व प्रज्ञावंत नागरिकांच्या आदर्श जीवनाची व राज्याची कल्पना ग्रीक तत्त्वज्ञांनीं एकसारखी डोळ्यांसमोर धरलेली दिसते. यांत ग्रीक समाजांतील गुलाम व नागरिक यांच्या द्वंद्वाचें प्रतिबिंब दिसत नाहीं काय?

तें द्वंद्व येथील भारतांतील समाजांत नाहीं व विचारांतहि नाहीं. येथील समाजव्यवस्थेंतहि परिचर्या करणारे शूद्र व समाजबाह्य अस्पृश्य होते. बटकींची खरेदीविक्री होत होती व द्यूतांत हरल्यामुळें द्रौपदी-सारखी सम्राज्ञीहि दासी झाली होती. पण याचा अर्थ आपल्या समाजव्यवस्थेंत **गुलामगिरीची संस्था** एक घटक म्हणून नांदत होती असा करतां येत नाहीं. सारा समाजच ग्रीक समाजाप्रमाणें गुलामगिरीवर आधारलेला होता असें तर मुळींच म्हणतां येत नाहीं! गुलामांची खरेदीविक्री लहान प्रमाणावर होती का मोठ्या प्रमाणावर होती हा प्रश्नहि भारतीय समाजा-पुरता गैरलागू आहे. येथील जीवनाचा आधार असा जो कृषिव्यवसाय तो गुलामांच्या राबवणुकीवर चाललेला नव्हता. उलट, तो स्वतंत्र शेतकऱ्यांच्या श्रमांवर चालला होता हें तर निर्विवाद आहे. म्हणून, या ना त्या स्वरूपांत आणि या ना त्या प्रमाणांत येथें गुलामगिरी होती असा सिद्धान्त मांडणें चूकच आहे. आपल्याकडे नग्नपंथीय साधू हजारों होते व आहेत, तसेंच अराजकाच्या काळांत ठगांची संख्याहि भलीमोठी वाढलेली होती; पण म्हणून नागवेपणावर किंवा ठगीवर आधारलेल्या सामाजिक संस्था होत्या असें म्हणणें जसें अशास्त्रीय ठरेल, त्याप्रमाणेंच गुलामांच्या खरेदी-विक्रीचीं हजारों उदाहरणें सांपडलीं तरी भारतीय समाजजीवनांत गुलामगिरीला स्थान होतें असें म्हणतां येत नाहीं.

### सांख्यदर्शनाचें महत्त्व

येथवरच्या विवेचनावर एक अशी शंका घेण्यांत येईल कीं सांख्यदर्शनाला अवास्तव महत्त्व देऊन हा प्रपंच रचण्यांत आला आहे. तिचें निरसन करून हा लेख संपवितों. अद्वैतदर्शनापुढें बाकी सर्व दर्शनें व्यर्थ आहेत व भारतीय तत्त्वचिंतनाचें सार व गाभा अद्वैत-सिद्धान्त आहे असें मत आज रूढ आहे. क्षणभर हें मत खरें मानलें तरी अद्वैताचा मुख्य प्रतिस्पर्धी ('प्रधानमल्ल') सांख्यमतच होय हें शंकराचार्यांनींच म्हटलें आहे. दुसरें असें कीं गीता, महाभारत इत्यादि ग्रंथांतून सांख्यांची प्रकृतिविषयक मतप्रणालीच ग्राह्य धरली आहे. ('गीतारहस्य' पान १६७–६८ पहा). त्याहून महत्त्वाची गोष्ट अशी कीं भारतीय वैद्यक, नाट्यशास्त्र इत्यादि शास्त्रांनीं सांख्यांचाच आधार








घेतलेला आहे. सांख्यकारिका इ. स. पूर्वी १०० किंवा नंतर १०० वर्षें अशा २०० वर्षांच्या कालखंडांत लिहिल्या गेल्या असल्या तरी ' प्रकृति ', ' महत् ' इत्यादि कल्पना व नुसताच भोग घेणाऱ्या ' पक्ष्या'ची कल्पना उपनिषदांतून आढळते. तेव्हां प्राचीनतम काळापासून अखंडपणें सांख्यदर्शनाचा प्रभाव मोठा होता हें उघड आहे. इतर कांहीं दर्शनांनींहि अकर्ता पुरुष मानलेला असल्यानें प्रस्तुत विवेचनाचें स्वरूप अगदी एकदेशीय व निरुंद पायांवर आधारलेलें आहे हा आक्षेप अयोग्य ठरेल. सांख्यदर्शनाची मर्यादा आंखून घेऊन केलेली ही चर्चा ढोबळ मानानें विचारांत घेण्याजोगी ठरावी एवढीच माझीहि अपेक्षा आहे.

## समाजजीवन व तत्त्वज्ञान यांचा अन्वय

समारोपापूर्वी एक गोष्ट वाचकांच्या नजरेस आणली पाहिजे. ग्रामसंस्था व 'प्रकृति' आणि राजा व 'पुरुष' यांचा जो अन्वय प्रस्तुत लेखांत दाखविला आहे तो ढोबळ आहे. एकाच भारतीय समाजव्यवस्थेचा असा अन्वय सांख्यदर्शनाशीं लावला तर मग अद्वैती, द्वैती व इतर दर्शनांशींहि तिचाच अन्वय लावणें कसें शक्य आहे ? कारण हीं दर्शनें तर परस्परांहून भिन्न आहेत. खुद्द सांख्यदर्शनांतहि ईश्वर मानणारे व न मानणारे असे पोटभेद आहेत. या भेदांचा अर्थ कसा लावावयाचा ? – इत्यादि महत्त्वाचे प्रश्न सहज निघूं शकतात.

या सर्व प्रश्नांचें एक उत्तर प्रथम असें द्यावें लागेल कीं **सामाजिक संस्था व तत्त्वज्ञान यांच्यामध्यें सरळ कार्यकारणभावाचा संबंध नसून परोक्ष अन्वयाचा संबंध असतो.** तोहि एकतर्फी नसून, संस्थांचा **परोक्ष परिणाम** दर्शनांवर व **दर्शनांचा परिणाम संस्थांवर** असा अन्योन्य संबंध असतो. शिवाय इतर मानवी व्यापारांप्रमाणें तत्त्वचिंतनाचा व्यापारहि सापेक्षतया स्वायत्त आहे व साहजिकच एका भूमींत अनेक वृक्ष पोसावे किंवा एका खोडांतून अनेक फांद्या निघत जाव्या त्याप्रमाणें आपल्या खंडप्राय देशांतील हजारों वर्षें चाललेल्या तत्त्वचिंतनाला बहुविध रूपें लाभलीं आहेत यांत नवल नाहीं. पण या बहुविधतेंतहि एक भारतीयत्व आहे. म्हणजेच भारतीय तत्त्वचिंतनांतील विविध दर्शनें ही चाकाच्या आऱ्यांप्रमाणें परस्पर विरुद्ध गेलेलीं दिसलीं तरी तीं एका केंद्रांतून निघालेलीं व एका परिघांत सामावलेलीं आहेत, असेंच आजचे सर्व भारतीय तत्त्ववेत्ते म्हणत आहेत. भारतीय तत्त्वचिंतनाच्या या गाभ्याचा व परिघाचा शोध करतांना येथील सामाजिक जीवनाच्या मूळ घटकांचा शोध करणें हें आवश्यक, निदान उपकारक, ठरेल. त्या दृष्टीनें सांख्यदर्शनांतील ' प्रकृती'चा व ग्रामसंस्थेचा अन्वय प्रस्तुत विवेचनांत मी मांडला आहे.

---

# स्वातंत्र्याची मानववादी प्रेरणा

मी १४ वर्षांचा शाळकरी असतांनाच माझ्या राजकीय जीवनास सुरवात झाली. मला मुक्त, स्वतंत्र व्हावयास हवें होतें. हल्लींची स्वतंत्रतेची – संपूर्ण निरुपाधिक स्वतंत्रतेची – कल्पना हें हल्लींचें नवीन खूळ आहे. त्याकाळीं तें नव्हतें. त्या वेळची स्वातंत्र्याची प्रेरणा मानववादी होती व त्या वेळचे क्रांतिकारक अशाच स्वातंत्र्याच्या प्रेरणेनें प्रेरित झाले होते. त्या काळीं आम्ही मार्क्स वाचला नव्हता. समाजांत एक अगदीं पददलित, श्रमजीवी वर्ग आहे याची आम्हांस जाणीव नव्हती. तरीपण अनेक क्रांतिकारक तुरुंगांत झिजून शेवटीं फांशी गेले ! त्यांना प्रेरणा द्यावयाला श्रमजीवी वर्ग नव्हता. वर्ग-विग्रहाचीहि त्यांना जाणीव नव्हती. कम्यूनिझमचेंहि त्यांना स्वप्न पडलें नव्हतें. परंतु त्यांच्या ठिकाणीं जीवनांतील असह्य परिस्थितीविरुद्ध बंड करण्याची, झगडण्याची मानवी प्रेरणा मात्र दुर्दम्य होती. ही असह्य परिस्थिति कशी बदलावयाची याचें त्यांना बिनचूक ज्ञान नव्हतें. पण ती परिस्थिति बदलावयाचा त्यांनीं या ना त्या मार्गानें प्रयत्न केला. माझ्या राजकीय जीवनास सुरुवात याच प्रेरणेंतून झाली, आणि अजूनहि मला स्फूर्ति त्याच प्रेरणेंपासून मिळते; 'कॅपिटल्'च्या तीन ग्रंथांपासून किंवा मार्क्सवाद्यांनीं लिहिलेल्या तीनशें ग्रंथांपासून नव्हे ! ही मानवी प्रेरणा हीच खरी मुक्ततेची मूलगामी प्रेरणा होय. याच प्रेरणेनें हें मानवांचें जग निर्माण केलें, याच प्रेरणेनें सरंजामशाही आणि भांडवलशाही जग निर्माण केलें. आणि हीच प्रेरणा आपल्या सध्या ध्येयसृष्टींत असलेलें, अधिक चांगलें जग निर्माण करणार आहे !

**– मानवेन्द्रनाथ रॉय,** ' रॅडिकल ह्युमॅनिस्ट ' ( ३१।१।५४ ) वरून

प्रा. व. म. परांजपे

# नोबेल पारितोषिकाचे मानकरी श्री. चर्चिल व त्यांचें वाङ्मय

**परिस्थितीच्या संघर्षांतून उद्‌भवलेलें वाङ्मय**

कवींवर क्रोधाविष्ट झालेल्या प्लेटोनें, त्यांना आपल्या ' आदर्श राज्या ' बाहेर हाकलून दिलें आहे. ' वाटल्यास ऑलिव पर्णांच्या मुकुटानें त्यांना विभूषित करा, वा सुवासिक जलसिंचनानें त्यांचा सन्मान करा, ' —पण म्हणून त्यांना प्लेटोच्या Republic मध्यें मात्र थारा नाहीं. या शापांतून मुक्ति मिळूं शकेल असे जे कांहीं थोडे भाग्यवान् लेखक आहेत त्यांत श्री. चर्चिल यांचा अनुक्रम बराच वरतीं लागेल. अंधकवि होमरनें एकहि युद्ध प्रत्यक्ष न बघतां त्याचें काल्पनिक नि असत्य वर्णन केलें, म्हणून त्यानें प्लेटोचा राग आपल्यावर ओढवून घेतला आहे. श्री. चर्चिल यांच्या बाबतींत या आरोपाची यत्किंचित्‌हि शक्यता नाहीं. त्यांनीं वर्णन केलेल्या महायुद्धाचीं वर्णनें त्यांच्या स्वतःच्याच अनुभवांतून निर्माण झालीं आहेत. कर्त्या पुरुषाचें कर्तृत्व, आणि प्रतिभावान् लेखकाची काव्य-शक्ति, यांचा मनोहर संगम त्यांच्या ठिकाणीं झाला असल्यानें, त्यांच्या सर्वच लिखाणाला एक वेगळीच धार निर्माण झाली आहे.

श्री. चर्चिल यांच्या लिखाणाचें हेंच मुख्य वैशिष्ट्य आहे. त्यांची ' Savrola ' ही कादंबरी, व ' Lord Randolph Churchill ' हा ग्रंथ– हे वगळ-ल्यास इतर सर्व वाङ्मयकृती ' प्रसंगोपात्त ' आहेत. ' उत्स्फूर्त ' असें वाङ्मय श्री. चर्चिलनीं लिहिलेलें नाहीं. परिस्थितीच्या संघर्षांतूनच त्यांचें सर्व वाङ्मय उगम पावलेलें आहे. पूर्णपणें ' कल्पनोद्भव ' अस-लेल्या वाङ्मयांत लेखकाच्या कल्पनाविलासाला जो मोकळा वाव मिळूं शकतो, तो येथें मिळत नाहीं. कल्पनाशक्तीवर प्रत्यक्षाची फारच मोठीं बंधनें पडतात. व त्याहिपेक्षां विशेष अडचण विषयाची कलात्मक रचना करतांना होते. ' वास्तविक घटनां'चें बंधन लेखकास दूर करतां येत नाहीं. वस्तुस्थितीचें हुबेहुब दर्शन घडवून त्यांतून सत्याचा मागोवा घेण्याचें दुहेरी कार्य त्यास करावें लागतें. यामुळेंच या प्रकारच्या वाङ्मयाबाबतच्या कसोट्याहि निराळ्या असतात. स्वतःच्या आयुष्यांत अनुभवलेल्या घटनांतून श्री. चर्चिल यांचें वाङ्मय निर्माण झालें असल्यानें, त्यांच्या जीवनाच्या धाग्यादोऱ्यांची वीण नीट समजल्यावांचून, त्याचें महत्त्व आकलन होणें शक्य नाहीं.

श्री. चर्चिल यांनी जरी एकाच विशिष्ट प्रकारचें लेखन केलें असलें, तरी या वाङ्मयप्रकारांत त्यांच्या प्रतिभेचें संचारक्षेत्र विस्तृत आहे. आज त्यांच ३५ ग्रंथ उपलब्ध आहेत. ' The Story of the Malakand Field Force ' ( 1898 ), ' The River War' (1899), 'London to Ladysmith via Pretoria' ( 1900 ), व 'Ian Hamilton's March,'– या सर्वांतून , श्री. चार्चिल यांनीं युद्धवार्ताहर या नात्यानें केलेल्या कामानिमित्त झालेलें लेखन आहे. युद्धवार्ताहर म्हणून चर्चिलनीं फारच चांगलें नांव मिळविलें. स्वतःचा जीव बेधडकपणें संकटांत घालूनहि त्यांनी बातम्या मिळविल्या आहेत. अशाच एका प्रसंगांत त्यांना झालेली कैद व त्यांतून त्यांनीं करून घेतलेली सुटका – हा सर्व अद्‌भुतरम्य इतिहास सर्वश्रुत आहे. परंतु या सर्वच लिखाणाचें महत्त्व , त्यांत वर्णिलेल्या घटनांशीं निगडित असल्यानें, व त्याला वर्तमानपत्री तुटकपणाचें स्वरूप आल्यानें , आज त्याची फारशी आठवण उरलेली नाहीं. त्यांची ' सव्ह्रोला ' ही कादंबरी तर कधींच लोकप्रिय होऊं शकली नाहीं. आजहि तिचें वाचन केल्यास , कादंबरी-कार होण्याचें भाग्य चर्चिलना लाभणें किती अशक्य होतें, हेंच उत्तम प्रकारें समजून येतें. कादंबरीच्या विषयाची मांडणी व रचना या सर्व बाबतींत श्री. चार्चिल यांचें कौशल्य अगदीच सुमार आहे.

**चित्रकलेच्या छंदाचें मानसशास्त्र !**

१९३२ मध्यें श्री. चर्चिलनीं लिहिलेल्या ' Thoughts and Adventures ' मधील








दोन लेख एकत्र करून 'Painting as a Pastime' या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. केवळ एक वेळ जाण्याचा उद्योग म्हणून सुरवात केलेल्या चित्रकलेंत, श्री. चार्चिल यांनीं पुढें चांगलीच प्रगति केली. या त्यांच्या प्रयत्नांचा इतिहास त्यांनीं या पुस्तकांत बऱ्याच आकर्षक पद्धतीनें कथन केला आहे. शेक्स्पिअरनें क्लिओपाट्राच्या सौंदर्याचें वर्णन, 'Age cannot wither, nor custom stale' असें केलें आहे. त्याच शब्दांत चित्रकलेचें महत्त्व श्री. चार्चिलनीं सांगितलें आहे. तरुणपणीं चित्रकलेची साधना करतांना, यशासाठीं अपरिमित कष्ट करणें शक्य आहे. परंतु चाळिशीची झुळुक लागलेल्या मध्यमवयीन गृहस्थाच्या बाबतींत 'धडाकेबाज सुरवातच' जरूर असते. या छंदाचें हें मानसशास्त्र लेखकानें फारच मनोहर पद्धतीनें उकलून दाखविलें आहे. याबाबत श्री. चार्चिल लिहितातः "वाढत्या वयानुरूप, दमछाट करणारे मर्दानी खेळ मागें पडतात. सारीं गात्रें शिथिल झालेलीं असतात. तारुण्योन्माद ओसरलेला असतो. पण याहि वयांत, चित्रकलेसारखा दुसरा सोबती नाहीं. त्याचेबरोबर वावरत असतां, शीण तर राहोच. पण आपल्या दुर्बल, दमल्याभागल्या वाटचालीला तो चांगली साथ करतो. रंगपटाचा हा पडदा, काळानें आपल्यावर रोखलेली नजर आणि झपाट्यानें येणारें वार्धक्य, कांहीं क्षण तरी आपल्या दृष्टीआड करूं शकतो. चित्रकार खरोखरीच किती भाग्यवान्! त्याला एकलेपणाची आग कधींच जाळणार नाहीं. प्रकाश, नयनमनोहर रंग, नीरव शांति व आशा चित्रकाराच्या शेवटच्या क्षणापर्यंत त्याला सोबत करतील."

वृद्धपणींहि या 'प्रेयसी'ची आराधना करतांना, 'बेदरकार मनोवृत्ती' चें 'तिकिट' जवळ असल्याखेरीज मधुचंद्राची सफर शक्य होत नाहीं. आपल्या पहिल्यावहिल्या प्रयत्नाच्या वेळी, बिचकतबाचकत एका लहानश्या ब्रशनें रंगाचीं पुसट आवरणें कॅनव्हस्‌वर चढवीत बसलेल्या चर्चिलना सर जॉन लॅव्हेरीच्या कलावान् पत्नीनें दिलेला पहिला धडा फारच बहुमोल ठरलाः "'चित्र ना रंगवीत आहां? मग येवढें बिचकत बिचकत कां? एक ब्रश द्या पाहूं जरा — चांगला जाडाच असूं दे!' लेडी लॅव्हरींनीं ब्रश घेऊन टर्पेंटाईनमध्यें तो बुचकळला, निळ्या नि पांढऱ्या रंगावर एकदां सारवला, आणि पॅलेटवर इकडे तिकडे चारदोन सपकन् फटकारे लगावले — नाहींतरी एव्हांना 'पॅलेट' मोठीच स्वच्छ राहिली होती, म्हणा! — आणि मग भीतीनें जणूं थरकांप उडालेल्या कॅनव्हस्‌वर एकामागून एक भले जाडजाड जोरदार फराटे ओढले. बिचारें कॅनव्हस याला काय प्रत्युत्तर देऊं शकत होतें? त्याच्यावरील या तडाखेबंद अत्याचाराबद्दल कुठलाहि देव तिला शिक्षा करीत नव्हता. असहायपणें तें नुसतें फडकत राहिलें! — "रंगवायला बसल्यावर आलेलें मनावरचें दडपण तेव्हांच साफ उडालें. मनांतले सारे विकल्प नाहींसे झालें. आणि मग मी पण एक भला मोठा दांडगा ब्रश घेतला, आणि माझ्या भक्ष्यावर त्वेषानें तुटून पडलों. त्या दिवसापासून कॅनव्हस्‌चा असा बागुलबोवा मला कधींच वाटला नाहीं."

## 'समकालीन महापुरुषां'चें सुभग दर्शन

कलात्मक वाङ्मय या दृष्टीनें श्री. चर्चिल यांचा नांवाजला जाणारा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे (Great Contemporaries) '**माझे समकालीन महापुरुष.**' व्हिक्टोरिया राणीचा काळ इंग्लंडच्या इतिहासांत निःसंशय भाग्याचा होय. फ्रेंच राज्यक्रांतीची धूळ पुरती बसून गेली होती. वॉटर्लूचा विजय, व ट्रॅफल्गारला रसातळास गेलेलें नेपोलिअनचें आरमार आणि विश्वविजेत्याचें स्वप्न — या सर्वांमुळें इंग्लंड जगाची अनभिषिक्त सम्राज्ञी बनलें होतें. याच वेळीं, एकाहून एक प्रतिभावान् कविश्रेष्ठ, थोरथोर विचारवंत, सैनिकी कौशल्यानें जगाचे डोळे दिपविणारे महान् सेनापती, बुद्धिविलासानें निसर्गाच्या शक्तीवर मात करणारे शास्त्रज्ञ, — या सर्वांचें इंग्लंड हें माहेरघर बनलें होतें. युरोपमध्येंहि त्याच तोडीचे अनेक पुरुषोत्तम त्यावेळीं आपला प्रभाव पाडीत होते. या सर्वांची एक तेजस्वी मालिका श्री. चर्चिलनीं या ग्रंथांत गुंफली आहे.

सर्वच व्यक्तिरेखा कांहीं आकर्षक उतरल्या आहेत, असें नाहीं. बऱ्याच ठिकाणीं, वर्तमानपत्री तुटक शैलीनें, संपूर्ण सुसंगत असें चित्र मनापुढें उभें राहूं शकत नाहीं. कांहीं लेखांत, शाळकरी निबंधांत शोभून दिसेल अशा कृत्रिम लेखनशैलीनें वर्णनाचा डौल







पार बिघडून गेला आहे. श्री. शॉ वरील लेख किंवा 'Hitler and his choice' हा लेख या दृष्टीनें निराशाजनकच वाटतात. परंतु ज्या व्यक्तींशीं श्री. चर्चिल समरस होऊं शकले व ज्यांच्या गुणांनीं त्यांना मोहून टाकलें, त्यांचीं चर्चिलनीं काढलेलीं चित्रें मनावर ठसा उमटविल्याशिवाय रहात नाहींत. उदार-मतवादी इंग्लंडचा नेता मोर्ले व अरेबियांत वास्तव्य करून अरब हक्कांसाठीं जिवाचें रान करणारा बहुढंगी 'ब्रिटिश–अरब' टी. एच्. लॉरेन्स यांच्या व्यक्ति-रेखांत, चर्चिलनीं शब्दचित्रकलेचा परमोच्च बिंदु गांठला आहे.

चर्चिलना आपल्या साऱ्या आयुष्यांत भेटलेल्या मनोवेधक व तेजस्वी 'चतुष्टयीं'त श्री. मोर्ले यांचें स्थान फारच मानाचें आहे. बोअर-युद्धावेळचें त्यांचें परिणामकारक वक्तृत्व आणि स्वायत्ततेच्या हक्काबाबत हिंदुस्थानचा केलेला अपवाद व त्याचें समर्थन यांची चर्चिलवर विलक्षण मोहिनी पडलेली आहे. विचारांच्या या साधर्म्यामुळें मोर्लेचें मनोगत हस्तगत करण्यांत चर्चिलनीं चांगलेंच यश मिळविलें आहे. राजकीय क्षेत्रांत निर्माण झालेल्या विरोधामुळेंहि चर्चिलवरचें त्यांचें 'पितृवत् वात्सल्यप्रेम' आटलें नाहीं. गुलाबी सौख्याचीं स्वप्नें घेऊन येणारी मोर्लेच्या जीवनाची पहांट व त्याच जीवनाची अंतिम काळरात्र यांमधील भयंकर विरोधावर, श्री. चर्चिल यांनीं आपल्या लेखणी-नें विदारक प्रकाश टाकला आहे.

'लॉरेन्स ऑफ अरेबिया'चें जग हें मोर्लेच्या जगाहून फारच निराळें होतें. 'अरबी भाषेंतील सुरस गोष्टीं'त शोभणाऱ्या नायकाप्रमाणें बेदरकार धडाडी, साहस व असामान्य कर्तृत्व यांनीं जगाला स्तिमित करणारा लॉरेन्स चर्चिलना जास्त निकटवर्ती वाटला तर त्यांत नवल तें काय ? वाळवंटांत वाऱ्याप्रमाणें बेछूट संचार करणाऱ्या या मुक्तबंध पुरुषाच्या भावनांना योग्य आवाहन करून, त्याला अधिकाराची जागा स्वीकारा-वयास लावण्याचें कसबहि चर्चिलनीं दाखविलें. त्यावेळीं अशा नोकरीच्या शृंखला पायांत स्वखुषीनें अडकवून घेण्याची लॉरेन्सनें दाखविलेली तयारी, लोकांना थक करून सोडणारी त्याची चिकाटी व धीमेपणा,—हा सर्वच इतिहास मनोवेधक आहे. अरबी प्रश्नाची बरीचशी सोडवणूक केल्यानंतरहि, आणखी महत्त्वाच्या जागांची लालूच दाखवून त्याला कायम जखडून ठेवण्याचा श्री. चर्चिल यांचा डाव उधळून लावतांना, लॉरेन्सनें काढलेले उद्गार अविस्मरणीय आहेत: "छे, छे! यानंतर माझें तुम्हांस जें दर्शन घडेल, तें फक्त माझ्या भरधांव जाणाऱ्या अश्वाच्या खुरांनीं क्षितिजावर उडालेल्या धुळीच्या लोटाच्या रूपानेंच !"

श्री. चर्चिल यांजबद्दल लॉरेन्सला वाटत असलेला नितांत आदर व्यक्त करण्याची त्याची पद्धतीहि तितकीच वैशिष्ट्यपूर्ण आहे. स्वतः लिहिलेल्या ग्रंथाची एक प्रत त्यानें चर्चिलना भेट दिली. व त्यासोबत पाठविलेल्या पत्रांत तो लिहितो: "अकरा वर्षें होऊन गेलीं, तरीहि आपण केलेलें कार्य नष्ट पावलें नाहीं. एका तपापूर्वी केलेल्या योजना आजहि टिकून रहाव्यात हा आपल्या राजनीतीचा मोठाच विजय आहे. खरें म्हणजे, या ग्रंथाच्या मी आपणांस 'दोन प्रती' सादर करावयास पाहिजेत !"

'ग्रेट कॉंटेंपोररीज्' या ग्रंथांत वर्णन केलेल्या प्रत्येक व्यक्तीनें स्वतःच्या क्षेत्रांत अत्युच्च मान संपादन केला आहे. त्या सर्वांबद्दलची सर्व माहिती एकत्र करून, त्यांचें महत्त्वनिदर्शन करणें येवढेंच काम असतें, तर त्यांत चर्चिल यांचा गौरव करण्यासारखें कांहींच नव्हतें. परंतु या महापुरुषांचें एक वैशिष्ट्यपूर्ण व कलात्मक दर्शन घडविण्याची जबाबदारी मात्र अवघड आहे. इंग्लिश वाङ्मयांत लिटन स्ट्रॅचीनें आपल्या कलाकृतींनीं या वाङ्मयप्रकाराबाबतच्या वाचकांच्या अपेक्षा फारच वाढवून ठेविल्या आहेत. त्याचा प्रत्येक नायक ज्या परिस्थितींत वाढला तिचें यथायोग्य चित्रण करून, त्या विशिष्ट पार्श्वभूमीवर आपल्या नायकाची जिवंत व्यक्तिरेखा उभी करण्याचें कौशल्य लिट्न स्ट्रॅची-च्या लेखणींत पुरेपूर भरलेलें आहे. नायकाच्या गुण-दोषांचें व व्यक्तिवैशिष्ट्यांचें योग्य दर्शन ज्यांतून घडेल, अशा सूचक घटना वेंचून काढून, त्यांच्या साहाय्यानें नाट्यपूर्ण पद्धतीनें आपणांपुढें जिवंत चित्र उभी करण्याची स्ट्रॅचीची पद्धत निःसंशय आकर्षक ठरते. श्री. चर्चिल आपल्या कांहीं लेखांत या तोडीची कारागिरी करून दाखवूं शकतात. स्वतः प्रभावी वक्ते असल्यानें, मोजक्याच वेंचक शब्दांत एखाद्या प्रसंगाची खुलावट करण्याची शक्ति त्यांचेजवळ भरपूर आहे. त्याच्याच जोडीला, मधूनमधून हलकेंच डोकावणारा







नर्म-विनोद, व त्याचबरोबर भावनांची सहज पकड घेणारी शब्दयोजना, यांच्या साहाय्यानें हे लेख संस्मरणीय झाले आहेत. लेखकाचा त्या व्यक्तींशीं आलेला प्रत्यक्ष संबंध, व जीवनाच्या सर्व अंगांचें सखोल ज्ञान, या दोहोंच्या मिश्रणानें या चित्रांचें महत्त्व जास्तीच वाढलेलें आहे. प्रस्तावनेंत चर्चिलनीं म्हटल्याप्रमाणें, एका फार महत्त्वाच्या कालाचें दर्शन यांत विविध बाजूंनीं घडविलें गेलें आहे. संकलित रूपानें सर्व लेखांचा विचार केल्यास, केवळ निरनिराळया व्यक्तींचेंच नव्हे, तर एका सबंध काललंडाच्या इतिहासाचें दर्शनहि या पुस्तकांत घडून येईल.

या प्रकारच्या पुस्तकाचें आणखी एक वैशिष्टय म्हणजे तें कोठेंहि वाचावयास सुरवात करावी व कोठेंहि संपवावें. त्याहिपेक्षां विशेष म्हणजे त्यांतील विषयांचें वैविध्य. एखादें पान उलगडून पुढें जावें, तों आपण महाबलाढ्य कैसरच्या दरबारांतून – महामिस्किल शॉ साहेबांच्या सहवासांत प्रवेश करतो. हिंडेनबर्ग आणि मोर्ले येथें पाटाला पाट लावून बसलेले आपणांस आढळतील. आणि त्याहिपेक्षां विशेष म्हणजे एक अत्यंत कसलेला व अनुभवी मुत्सद्दी असा हा लेखक कोणताहि आडपडदा न ठेवतां दिलखुलासपणें, त्यांच्या-बद्दलचे आपले भलेबुरे विचार वाचकांनवळ बोलून दाखवीत असतो. विषयाइतकेंच, किंबहुना जास्तीच महत्त्व, लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणाऱ्या दर्शनाला असतें. पुस्तकावरून सहज नजर फिरवितां फिरवितां, डोळयांसमोर एखादा विचारमग्न चेहरा उभा राहतो. हळूं हळूं त्या पुसट आकृतीवर भाव उमटूं लागतात. चित्राचे निरनिराळे भाग एक नवीन सुसंगति साधूं लागतात. आणि तेवढ्यांत लेखक हळूंच आपल्या कानांत, कुतूहल जागें करणारी एखादी कथा कुजबुजतो. त्या व्यक्तीच्या विचारांचें माहात्म्य आपणांस स्पष्ट होऊं लागतें. ग्रंथाचीं पानें आणि त्यावरील शब्द हे दिसेनासे होतात आणि एक भव्य मानवी आकृति आपल्या मनाची पकड घेते. अशा रीतीनें व्यक्ति-निर्मिति करतांना, लेखक प्रत्यक्ष सृजनशील परमेश्वराशीच स्पर्धा करीत असतो. आणि यांतच वाङ्मयीन कलाकृतीच्या वैभवाचें बीज आहे.

'Great Contemporaries' अनेक दृष्टींनी, पुढें येणाऱ्या 'दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या इतिहासा'ची पूर्वतयारीच होती, असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. इतिहास, काव्य व चरित्रवाङ्मय यांचा योग्य मिलाफ घडवितां आल्यावांचून असा ग्रंथ यशस्वी करणें अशक्यच. नाट्यकार व नायक अशा दोन्ही भूमिका यांत श्री. चर्चिलनीं फारच यशस्वी रीतीनें वठविल्या आहेत.

## विरोधी भूमिकांचा मनोज्ञ संगम

महायुद्धासारखा चित्तथरारक आणि भव्य असा दुसरा विषय कलाकृतीचा विषय म्हणून मिळणें कठीणच ! होमर-व्यासांसारख्या महान् कलावंतांच्या प्रतिभेला अशा तऱ्हेच्या जगड्व्याळ महायुद्धांनीं आवाहन करून कलाकृति निर्मिण्यास प्रवृत्त केलें आहे. अति उदात्त स्वरूपाच्या या प्रतिभाविलासांत श्रेय संपादन करणें, हा वाङ्मयक्षेत्रांतील बहुमोल मान होय. श्री. चर्चिल यांची कामगिरी यापेक्षां कांहींशी वेगळया स्वरूपाची होती खरी. प्रत्यक्ष घटनांच्या काव्यात्मक वर्णनापेक्षां ऐतिहासिक सत्याचीच प्रतिष्ठा त्यांना अधिक राखणें भाग होतें. शिवाय, सगळया भू-गोलाचा थरकांप उडविणाऱ्या या दुसऱ्या महा-युद्धांतील त्यांचे स्वतःचे अनुभव हा आत्मचरित्रपर भागहि त्यांतच समाविष्ट असल्यानें, त्यांची जबाबदारी आणखीच दुणावते. ब्रिटिश राष्ट्रकुलाचा पंतप्रधान आणि युद्धकालांतील संरक्षणखात्याचा प्रमुख अशा दुहेरी जबाब-दारीच्या अधिकारपदावर असतांना त्या दृष्टिकोणांतून सर्व कथासूत्र त्यांनीं आपल्या 'War Memoirs' मध्यें ओवलें आहे. स्वतः दिलेल्या सूचना, तारा, पत्रें, खलिते ही त्यांची मूळ सामग्री ! यांत कानामात्रेचाहि बदल करणें लेखकास केवळ अशक्य ! याबद्दल लिहितांना, श्री. चर्चिल म्हणतातः "ज्या विशिष्ट क्षणीं हें सर्व लिहिलें गेलें, त्या क्षणाशीं त्यांचें महत्त्व निगडित झालें आहे. तीं बदलतां यावयाचीं नाहींत. आणि जरी तसें करा-वयाचें म्हटलें, तरीहि जें त्या वेळीं लिहिलें गेलें, त्यापेक्षां अधिक कांहीं मी लिहीन असें मला वाटत नाहीं. कारण हीं सर्व अस्सल कागदपत्रें व हे खलिते, संकटें एकामागून एक कोसळत असतांनाच मी लिहिलीं आहेत. आणि हें आहे तसेंच ठेवून, त्या-वरूनच माझ्या कार्याचें मूल्यमापन व्हावें, अशी माझी अपेक्षा आहे."








हें वाचल्यानंतर मात्र, 'श्री. चार्चिल यांचें वाङ्मय उत्स्फूर्त नाहीं' असें जें मी वर म्हटलें आहे त्यांत बदल करावासा वाटूं लागतो. मोजक्याच शब्दांत हृदय हलवून सोडणाऱ्या प्रसंगांचें यथायोग्य चित्रण करण्याच्या त्यांच्या कौशल्याचा आणखी कोणता पुरावा पाहिजे? ऐन रणधुमाळींत आणि भीषण हत्याकांडांत, त्यांची लेखणी अव्वल दर्जाच्या लेखकाचें कसब दाखविते. कधीं त्या घटनांचें कर्तेपदच त्यांचेकडे असतें, तर कधीं त्रयस्थाच्या भूमिकेवरून ते आपले विचार मांडतात. या दोन्हींहि भूमिकांचें एकत्र दर्शन, हें या ग्रंथाचें एक खास वैशिष्ट्य आहे.

येथें श्री. चार्चिलना दुहरी भूमिका पार पाडावयाची आहे: एक, इतिहासकाराची आणि दुसरी, वैयक्तिक स्मृती सादर करणाराची. या ग्रंथांत, या दोन्ही वृत्ती पुरत्या एकजीव झाल्या आहेत. पण मुळांत त्या खरोखरी किती विरोधी प्रकृतीच्या! कारण इतिहासकाराचा निःपक्षपाती दृष्टिकोण, आणि स्मृती सादर करीत असतांना त्यांतील व्यक्तिगत अनुभवाचा भाग, या दोहोंची गल्लत झाल्यास त्या लेखनाला हिणकसपणा प्राप्त होईल. ऐतिहासिक सत्याचा यत्किंचित् अपलाप न करतां, त्याला व्यक्तिगत अनुभवांची सोनेरी झालर लावून इतिहास अधिक खुलला आहे, नटला आहे असें वाटतें. यांत विरोधी भूमिका एकत्र नांदवून सौंदर्यनिर्मितीची अवघड जोखीम लेखक पत्करीत असतो. आणि ती श्री. चार्चिल यांनी कुशलतेनें पार पाडली आहे.

दुसऱ्या महायुद्धांतील उभय पक्षाच्या जयापजयाची कथाच अति नाट्यपूर्ण आहे. आपल्यासारख्या सामान्य माणसाला त्याचें अर्धस्फुट दर्शन वतमानपत्रांतील 'तयार केलेल्या' बातम्यावरूनच घडलें. पण पडद्याआड चाललेल्या घालमेलींचें स्वरूप त्याहून मनोरंजक होतें याची आपल्याला कल्पना तरी येते का? युद्धकाळांत अर्ध्या-कच्च्या मिळालेल्या बातम्यांवरून आणि उडालेल्या बावड्या पाहून सामान्य वाचकांच्या जिज्ञासेला तहान लागते. या ग्रंथांतील पडद्याआडच्या रम्य कथा वाचकांची ही तृषा निश्चित शमवतात.

### हिंदी स्वातंत्र्य – आणि रूझव्हेल्ट

भारतीय स्वातंत्र्याच्या वाटाघाटींपाठीमागें रूझवेल्ट यांचा 'भारताला स्वातंत्र्य देणें हाच न्यायाचा पक्ष आहे' असा सारखा लकडा श्री. चर्चिल यांच्या पाठीमागें लागला होता. हें करीत असतां, भलत्या, नको त्या गोष्टींत आपण नाक खुपसीत आहोंत, असा समज चर्चिल यांचा होऊं नये, इतपत सावधान धोरण त्यांनीं ठेवलें होतें. या प्रकरणीं, चर्चिल यांची प्रतिक्रिया कोणाहि हिंदी माणसाला मौजेची वाटेल.

हिंदी प्रश्नाबाबत प्रथमच झालेल्या बोलण्याबद्दल श्री. चर्चिल म्हणतातः "रूझवेल्टनीं हें मत प्रदर्शित केल्यावर मी इतका संतापलों, कीं पुन्हां तो प्रश्न समक्ष काढण्याची त्यांची छातीच झाली नाहीं!" – पण तरी याबद्दल त्यांच्यावर दडपण आणण्याचें रुझवेल्ट यांचे प्रयत्न चालूंच राहिले. प्रे. रुझवेल्टनीं एका पत्रांत अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाचा उल्लेख करून, लिहिलें आहेः "मी या हिंदी प्रश्नाकडे ऐतिहासिक दृष्टीनें पहात आहे." जिव्हारीं लागेल असाच तो उल्लेख होता. हिंदी लोकांना राष्ट्रीय सरकार स्थापूं देण्याची संधि द्यावी या सूचनेवर तर चर्चिल तुटूनच पडले आहेत; "याअगोदर (हिंदी राजकारणांत) घडलेल्या प्रसंगांनीं हिंदी राष्ट्रीय सरकार स्थापन करण्याचे मूर्खपणाचे प्रयत्न अशक्यच होऊन बसले आहेत, हें मी माझें भाग्यच समजतों. ध्येयवादाशिवाय मानवाची प्रगति अशक्य आहे, हें खरें. पण हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवणारा ध्येयवाद हा केव्हांच चांगला नाहीं आणि शिवाय त्याची कांस धरतांना लाखोंच्या संसारांची त्यामुळें धूळधाण उडेल व रक्ताच्या नद्या वाहून सर्वनाश होईल, या विचाराकडे दुर्लक्ष करणें तर निश्चित अयोग्य आहे. मग तो ध्येयवाद किती का उदात्त असेना!" – खुद्द हिट्लर जरी आपल्या क्रूर लोंढयासह पुढें ठाकला असता, तरीहि चर्चिलनीं इतकें रौद्र स्वरूप धारण केलें नसतें!

ज्यानें स्वतःच्या बुद्धिबलानें व बाहुबलानें हा इतिहास घडविला, त्याच्याच शब्दांत ते प्रसंग वाचावयास मिळणें कमालीचें हृद्य होय! मानवी स्वभावाच्या विविध छटा दाखविणारे अनेक प्रसंग, त्यांच्या ह्या ग्रंथांत ठिकठिकाणीं विखुरलेले आहेत.

### "A friend in need — !"

२० जून १९४२ चा प्रसंग! प्रवासाच्या श्रमानें विलक्षण थकलेले श्री. चर्चिल यांनी अमेरिकन मदतीचीं बोलणीं करण्याकरितां प्रे. रूझवेल्टच्या अभ्यासि-








केंत प्रवेश केला. रूझवेल्टच्या हातांत नुकतीच एक तार पडली होती. निःशब्दपणें, तशीच ती तार त्यांनीं चर्चिलच्या हातांत दिली. तारेंत मजकूर होताः "२५००० सैनिक कैदी होऊन, टोब्रुक पडलें" !

नशिबानेंच चर्चिलवर सूड उगविला होता.

"युद्धकाळांत अनेक दणके मिळाले, पण हा धक्का सर्वांत जबरदस्त वाटला मला ! या घटनेचे परिणाम केवळ लष्करी दृष्टीनेंच भयानक होते असें नाहीं, तर त्यामुळें ब्रिटिश सेनेच्या लौकिकालाच कलंक लागला होता. संख्याबलानें कितीतरी कमी असलेल्या जपान्यांपुढें, सिंगापूरला आमच्या ८५००० सैनिकांनीं शरणागति पत्करिली. आणि आतां टोब्रुक ! कसलेल्या २५००० च्या तोफखान्यानें ( खरा आंकडा सांगायचा तर ३३००० ! ) त्यांच्या निम्म्यानें असलेल्या शत्रुसेने-पुढें शस्त्रें खालीं ठेवलीं !" जगांतील कोणतीहि नाट्य-वस्तु या दुर्दैवी व लज्जास्पद घटनेंपुढें फिकी पडेल.

सर्वसाधारण वाचकाच्या हृदयांत कालवाकालव होईल अशा शब्दांत श्री. चर्चिलनी हा प्रसंग वर्णिला आहेः "या धक्क्यानें विव्हल झालेली माझी मनःस्थिति मी प्रेसिडेंटपासून लपवून ठेवण्याचा प्रयत्न केला नाहीं. मोठा दारुण प्रसंग होता तो. पराभव होणें वेगळें, आणि ही अशी नाचक्की वेगळीं !"... "परंतु त्यावर दोष माथीं मारण्याचा प्रयत्न नाहीं, कीं कठोर शब्दांची देवाणघेवाण नाहीं." "माझ्याकडून मी तुम्हांला कोणती मदत करूं ?" या रूझव्हेल्टच्या प्रश्नाला उत्तर म्हणून, 'जास्तीत जास्त शेर्‌मान टँक्सच्या ताबडतोब पुरवठ्या'ची मागणी चर्चिलनीं केली. स्वतःच्या सगळ्या अडचणी तांतडीनें दूर सारून रूझवेल्ट व मार्शलनी ३०० शेर्‌मान टँक्स सर्वांत वेगवान् जहाजांत ताबडतोब रवाना केलीं. परंतु दैवाची गति अतर्क्य असते, हेंच खरें ! बर्म्युडाजवळ शत्रूच्या पाणबुडीनें टँक्सचीं एंजिनें भरलेल्या जहाजाला जलसमाधि दिली ! चर्चिल पुढें लिहितात : "आम्हांला पुनः मागणी करावयाला अवसरहि न देतां, त्याआधींच दुसऱ्या एका जहाजाची रुझवेल्टनी रवानगी केली."

"A friend in need is a friend indeed !" असे चर्चिलचे यावरचे उद्गार आहेत. वापरून वापरून गुळगुळीत झालेल्या व एरवीं निरर्थक भासणाऱ्या या म्हणीला, चर्चिल आणि त्यांचें खोडकर दैव यांच्या हळुवार स्पर्शानें केवढें बोलकें करून सोडलें आहे !

स्टॅलिनशीं झालेली त्यांची पहिली मुलाखत अशी-च संस्मरणीय आहे. स्टॅलिनचें विचारपरिवर्तन करणें ही कांहीं साधी बाब नव्हती. कसलेल्या राजकारणी मुत्सद्द्याचें सर्वस्व येथें पणास लागणार होतें. उगीच घोळ न घालतां, चर्चिल यांनीं आपली बाजू स्पष्ट मांडली व आपल्या नेहमीच्या धडाडीला साजेशा पद्धतीनें दुसरी आघाडी उघडण्याच्या अप्रिय आणि वादग्रस्त मुद्द्यालाच हात घातला. स्टॅलिनचा घुमेपणा आणि कडवा प्रतिकार यांना तोंड देणें महाकठिण काम होतें. दुसरी आघाडी उघडण्याबाबतचा सर्व आराखडा पुढें करून, कोणतेहि धोके वेडगळपणानें पत्करण्यांत आत्मनाशासच आपण कसें कारणीभूत होऊं हें त्यांनीं दाखवून दिलें. अस्सल क्रांतिवाद्याला शोभेल असेंच स्टॅलिनचें उत्तर होतें : "ज्याला धोके पत्करण्या-ची भीति वाटते, त्यानें युद्ध जिंकण्याची भाषा न बोललेलेंच बरें !"

या चर्चेतून आणखीच मतभेद वाढविणाऱ्या गोष्टी निष्पन्न झाल्या. परंतु इंग्लंडनें जर्मनीवर केलेल्या तुफानी बॉम्ब-हल्ल्याचें मात्र स्टॅलिननें मनापासून कौतुक केलें आणि या लहानशा प्रसंगानें वातावरणाची कटुता निवळण्यास मदत झाली. चर्चिलनीं एका कागदावर एक सुसरीचें चित्र काढलें व तिच्या टणक नाकाडावर हल्ला करतां करतां, सुसरीच्या पोटावर — तिच्या मर्मस्थानावरच आघात करून तिची शिकार कशी साधावयाची हा बेत स्टॅलिनला समजावून सांगितला. या योजनेबाबत स्टॅलिनचें औत्सुक्य परा-कोटीला गेल्यानें तो नकळत उद्गारला "ईश्वर तुम्हांस यश देवो !"......

**एक सुरस प्रेमकथा !**

'डी' डे च्या दिवशीं, त्या सागरी योजनेंत एखाद्या तरुणालाहि लाजवील अशा तडफेनें चर्चिल व त्यांचेबरोबर इंग्लंडचे राजे सहावे जॉर्ज यांनीं तोफेचा पहिला धुमधडाक्याचा सोहळा स्वतः एका क्रूझर-वरून पहाण्याचा धरलेला हट्ट कोण विसरूं शकेल ? या प्रसंगाच्या निमित्तानें झालेला उभयतांचा पत्र-व्यवहार खरोखरीच वाचनीय आहे. त्या दोघांनीं जाण्याचा प्रथम ठरविलेला बेत रद्द करून चर्चिलनेंहि








हा धोका पत्करूं नये असें राजानें कळविलें. त्यानंतर झालेले संवाद फारच बहारीचे आहेत.

सागरी तांड्याबरोबर राजेसाहेबांनीं जाणें कितपत श्रेयस्कर आहे याबद्दल ॲड्मिरलचें मत विचारतां, त्याजकडून स्वच्छ नकार आला. यावर राजानें सरळच प्रश्न केला कीं, "ज्याठिकाणीं मी जाणें श्रेयस्कर ठरत नाहीं, तेथें पंतप्रधानानें जाणें कितपत योग्य आहे ?"

परंतु चर्चिलच्या दृष्टीनें, त्यांची सर्वच गोष्ट वेगळीच होती ! कारण संरक्षणमंत्री या नात्यानें तेथें जाणें त्यांचें कर्तव्यच होतें.

यावर सर ॲलन् लॅसेल्स् यांनीं गंभीरपणानें श्री. चर्चिल यांचें निदर्शनास आणलें कीं, "उद्यां इंग्लंडचा पंतप्रधान इंग्लिश खाडीच्या तळाचा ठाव घेण्यास कायमचा गेला आहे असें राजेसाहेबांस कळलें, तर त्यांची काय अवस्था होईल ?" – आणि त्याशिवाय दुसरें असें कीं, खास परवानगीवाचून कोणाहि प्रधानाला राजाच्या अंमलाबाहेरील हद्दींत जाण्याची मुभा नसते !

उत्तर तयारच होतें ! "हें, याठिकाणीं लागूं पडत नाहीं. कारण मी जात आहे तो राजेसाहेबांच्याच आरमारांतील एका जहाजावर."

परंतु सरतेशेवटी, चर्चिलचा 'जिव्हाळयाचा स्नेही, ६ वा जॉर्ज R. I.' याच्या पत्रांतील प्रेमळ मनाई-मुळें हें प्रकरण येथेंच समाप्त झालें.

ज्या देशांत, राजा आणि पंतप्रधान यांच्यांत ऐन रणधुमाळींत ब्रिनीवर कोणीं जावयाचें याबद्दल घरगुती तंटा होतो, तो देश केवढा भाग्यवान् ! आणि त्याहि-पेक्षां, सत्तेचा मान व सूज्ञपणाचा तोल बिघडूं न देतां, अशावेळीं निर्णय घेतला जातो व मानलाहि जातो, हेंहि दुर्लभच ! युद्धाच्या कथापर्वांतील ही एक सुरस प्रेमकथाच आहे.

श्री. चर्चिल हे खऱ्या अर्थानें कलावंत साहित्यिक आहेत किंवा नाहीं, हा वादंग घालणें माझे दृष्टीनें निष्फळ आहे. ते साहित्यिक ठरोत वा न ठरोत, त्यांच्या वाङ्मयकृतींचा परिमल सतत दरवळत राहील. मानवी मनाचा वेध घेणारे ललित पण ऐतिहासिक असें हें त्यांचें दुसऱ्या युद्धाचें महाभारत, युगाची एक महान् कृति म्हणून गणलें जाईल हें निःसंशय व म्हणूनच नोबेल पारितोषिक देऊन केलेला श्री. चर्चिल यांचा गौरव यथायोग्यच आहे, असें कोणाहि साहित्यप्रेमी रसिकास वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.

## मुत्सद्दी, वीर आणि साहित्यिक

मोठे मुत्सद्दी आणि मोठे वीर हे मोठे साहित्यिकहि असणें हा योग फारच विरळा. ऐन धुमश्चक्री-मध्यें अविचल रहाणें आणि आपल्या उक्तीनें व कृतीनें धीराची प्रेरणा देणें हें सर विन्स्टन यांच्या रक्तांतच आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत कोठें फट (cleavage) दिसत नाहीं. त्यांच्या स्वभावांतहि गूढता नाहीं. त्यांच्या दृष्टीला विश्वाचें सत्य उखळून पडलेलें दिसत नाहीं, तें एकसंध आणि शाबूत दिसतें. "आपल्या समोर हें जग पसरलेलें आहे, त्यावरील वाटा दिसत आहेत, निशाणें फडफडत आहेत, सूर्य प्रकाशत आहे, तारे लुकलुकत आहेत, कुठें जायचें हेंहि ठरलें आहे" अशी त्यांच्या मनाची ठेवण आहे.

शर्यतीच्या मैदानावर धावणाऱ्या खेळाडूप्रमाणें त्यांच्या साहित्यांत कोठें जायचें याची निश्चयात्मक जाणीव आणि त्याबद्दलचा सानंद अभिमान भरून राहिला आहे. त्यांचा प्रत्येक शब्द म्हणजे अर्धी कृतीच होय. मनानें ते उत्तर-व्हिक्टोरिअन् आहेत. त्यांनीं टक्केटोणपे खूप खाल्ले आहेत. किंबहुना टक्केटोणपे खावयाचें त्यांनीं आपण होऊनच पत्करलें !

"सर विन्स्टन यांची राजकीय आणि साहित्यिक कर्तबगारी इतकी मोठी आहे कीं तिचा विचार करतां सिसेरोची प्रतिभाशाली लेखणी लीलेनें खेळविणारा सीझर असें त्यांचें चित्र रेखाटण्याचा मोह अनावर होतो. दोन गुणांचा असा नजरेंत भरणारा दुर्मिळ संगम आपल्या ठिकाणीं एकवटविणारा एक ऐतिहासिक महापुरुष इतक्या जवळून आतांपर्यंत पहायला मिळाला नव्हता."

— सिग्फ्रिड सिवर्ट्झ [ नोबेल-पारितोषिक-समितीतर्फे स्टॉकहोम येथें नोबेल पारितोषिक अर्पण करतांना केलेल्या भाषणांतून ( ११-१२-५३ ) ]








श्री. श्री. वि. हर्षे

# बुद्धिवाद आणि जडवाद

' बुद्धिवाद ' आणि ' श्रद्धावाद ' हे शब्द प्रकांड-पंडितापासून तों फारसें शिक्षण न घेतलेल्या सामान्य माणसांपर्यंत सर्व लोकांच्या वापरण्यांत येतात. पण हे शब्द वापरणाराच्या मनांत त्यांच्याविषयीं कांहीं निश्चित कल्पना असतात किंवा या विषयींच्या एका बुद्धिमंताच्या कल्पना दुसऱ्या बुद्धिमंताच्या कल्पनेशीं जुळतात असेंहि नाहीं. पण स्थूलमानानें असें म्हणतां येईल कीं ज्या गोष्टींचें माणसाला प्रत्यक्ष ज्ञान होतें अशा गोष्टींवर विश्वास ठेवणाऱ्या माणसाला आपण बुद्धिवादी समजतों. आणि ज्या गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं अशा गोष्टींवर विश्वास ठेवणाऱ्या इसमाला आपण श्रद्धाळू म्हणतों. देवभोळे लोक, शकुनावर विश्वास ठेवणारे लोक, ज्योतिषावर विश्वास ठेवणारे लोक यांना श्रद्धाळू या विशेषणानें संबोधण्यांत येतें. या उलट पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, गणित, प्राणिशास्त्र वगैरे प्रत्यक्षानुभूतीवर आधारलेल्या शास्त्रांनीं सिद्ध झालेल्या गोष्टींनाच जो सत्य मानतो त्यालाच बुद्धिवादी म्हणून संबोधण्यांत येतें.

सकृद्दर्शनीं बुद्धिवाद आणि श्रद्धावाद हे अशा तऱ्हेनें परस्परविरोधी अर्थाचे शब्द आहेत. ज्या ठिकाणीं बुद्धिवादाचें अस्तित्व आहे त्या ठिकाणीं श्रद्धावाद असूं शकणार नाहीं आणि ज्या ठिकाणीं श्रद्धावाद आहे तेथें बुद्धिवाद कार्य करूं शकणार नाहीं असा एक निष्कर्ष काढण्यांत येतो. याच विचारसरणीनें बुद्धिवादी लोक श्रद्धावाद्यांची टिंगल करतात आणि श्रद्धावादी लोक बुद्धिवाद्यांच्या वाटेला जाण्याचें टाळतात. याच दृष्टीनें असें मानण्यांत येतें कीं अशिक्षित असंस्कृत मनामध्यें-च श्रद्धा नांदूं शकते. मानवी मन जसजसें प्रगल्भ होत जातें, आधुनिक बुद्धिनिष्ठ ज्ञानाचा संस्कार त्याच्यावर होत जातो, तसतसें श्रद्धेचें निर्मूलन होतें आणि श्रद्धेची जागा बुद्धि घेते. अर्थातच ही विचार-प्रणाली कितपत बरोबर आहे हा एक विचाराचाच प्रश्न आहे. श्रद्धा आणि बुद्धि यांचा संबंध अहिनकुलवत् आहे किंवा काय, या दोन गोष्टी स्वतंत्र रीतीनें राहूं शकतात किंवा काय, या मूलभूत गोष्टींचा विचार केल्या-नंतरच या विचारप्रणालीच्या सत्यासत्यतेबद्दल आपणा-ला निर्णय घेतां येईल. पण हा विषय बराच विस्तृत आहे. प्रस्तुत लेखांत श्रद्धावाद आणि बुद्धिवाद यां-पैकीं फक्त बुद्धिवादाचा सूक्ष्म अभ्यास करून बुद्धि-वादाच्या दृष्टिकोणांतून जडवादाचें निरीक्षण करावयाचें आहे.

## बुद्धिवादाचें स्वरूप

आपणाला जें बाह्य जगाचें ज्ञान होतें तें पंच ज्ञानें-द्रियें ( नाक, कान, डोळे, जीभ व त्वचा ) आणि बुद्धि यांच्या योगानें होतें. पंचज्ञानेंद्रियाचा बाह्य जगताशीं संपर्क आल्यावर जी माहिती गोळा केली जाते तिच्या-वर मानवाच्या बुद्धीनें संस्कार केले म्हणजेच त्याला ' ज्ञान ' ही संज्ञा प्राप्त होते. किंबहुना पंचज्ञानेंद्रियांच्या साहाय्यानेंच बुद्धि ज्ञानसंचय करीत असते, असें म्हणा-यला कांहींच प्रत्यवाद नाहीं. याच दृष्टीनें ' ज्ञानेंद्रियां-ना गोचर होणारें तेवढेंच ज्ञान ' हा बुद्धिवाद्यांचा पहिला कटाक्ष आहे. याच मूलभूत भूमिकेवर बुद्धि-वादी ज्ञानार्जन करीत असतो. अशा तऱ्हेनें ' ज्ञानेंद्रिय-गोचरत्व ' किंवा ' प्रत्यक्षानुभूति ' ही बुद्धिवादाची पहिली अनिवार्य अट मानिली जाते.

पण केवळ प्रत्यक्षानुभूतीवर अवलंबून राहून बुद्धि-वादाला भागत नाहीं हें उघड आहे. पृथ्वीपासून सूर्याचें अंतर प्रत्यक्ष मोजतां येत नाहीं. चंद्रावर हवा आहे किंवा नाहीं हें प्रत्यक्ष पाहतां येत नाहीं. गुरुत्वा-कर्षणाची शक्ति प्रत्यक्ष दिसत नाहीं. दुर्बिणीसारख्या साधनांनीं दृष्टिगोचर न होणाऱ्या गोष्टी विज्ञानशास्त्रांत खऱ्या मानल्या जातात, हें विश्वविश्रुत आहे. याचाच अर्थ असा कीं, प्रत्यक्षानुभूतीबरोबरच बुद्धिवादाला 'अनुमाना'चीहि मदत घ्यावी लागते. मात्र हें अनुमान प्रत्यक्षानुभूतीवर आधारलेलें असावें असा बुद्धिवादी शास्त्रांचा कटाक्ष असतो.







पण बुद्धिवादी शास्त्रांचें जर अधिक निरीक्षण केलें तर असें दिसेल कीं प्रत्यक्षानुभूति आणि अनुमान यांवर अवलंबून राहूनसुद्धां त्यांचें भागत नाहीं. जगांतील यच्चयावत् पदार्थमात्रांचें मूळ स्वरूप गतिमय अणूंचें आहे. या ( Atom ) परमाणूमध्यें एक मध्यवर्ती ( Nucleus ) केंद्र असून त्याच्याभोवतीं इतर बीजकें ( Electrons ) चक्राकार गतीनें फिरत असतात. ही क्रिया विद्युत् प्रक्रियेनें चालते ही गोष्ट विज्ञानशास्त्रानें आज सत्य म्हणून मान्य केलेली आहे. यापैकीं कोणतेच अणू सूक्ष्मदर्शक यंत्राला गोचर नाहींत किंवा त्यांची ही गतीहि दृश्य नाहीं. त्यांपैकीं कांहीं अणूंचा मार्गच काय तो फोटो घेऊन ठरवतां येतो. त्याचप्रमाणें आपणाला जो प्रकाश मिळतो त्याचें मूळ स्वरूप काय आहे, तो पुंजक्यांनीं आपणाला मिळतो कीं त्याची गति अविरत आहे वगैरेसंबंधींहि परस्परविरुद्ध विचारप्रणाली (Hypothesis) प्रचलित होत्या. पुढें कांहीं दिवसांनीं या परस्परविरुद्ध प्रणालींचें एकीकरण करण्यांत आलें. सापेक्षतावादा- (Relativity) चा विस्तार म्हणजे सुद्धां अशाच प्रणालींचा एक समूह आहे. याचाच अर्थ असा कीं मूर्त पदार्थांवर प्रयोग करून त्यावरून अनुमानें काढणें हा जसा विज्ञान-विकासाचा एक मार्ग आहे त्याचप्रमाणें अमूर्त विचारप्रणाली गृहीत धरून ती प्रयोगांनीं सिद्ध करण्याचा प्रयत्न करणें हा सुद्धां विज्ञान-विकासाचा दुसरा मार्ग आहे. अशा तऱ्हेनें विज्ञानशास्त्राच्या सत्याच्या परिसीमेमध्यें प्रत्यक्षानुभूति, ती शक्य नसेल तेव्हां अनुभूतीवर आधारलेलें अनुमान, आणि तेंहि शक्य नसेल तेव्हां प्रथम एक विचारप्रणाली गृहीत धरून ती प्रयोगानें सिद्ध करण्याचा प्रयत्न करणें या सर्व गोष्टींचा अंतर्भाव होतो. वरील चर्चेवरून आधुनिक शास्त्रांच्या बुद्धिवादाची व्याप्ति पुढीलप्रमाणें सांगतां येईल : (१) ज्ञानेंद्रियगोचरत्व (२) प्रत्यक्षानुभव (३) अनुमान (४) गृहीत विचारप्रणाली ( Hypothesis ).

## ' ज्ञानेंद्रियगोचरत्व '

बुद्धिवादाची मूळ उभारणी ज्ञानेंद्रिय-गोचरत्वाच्या कल्पनेवर केली जाते हा महत्त्वाचा मुद्दा ध्यानांत ठेवला म्हणजे या ज्ञानेंद्रियगोचरत्वाच्या कल्पनेमुळें कशा गंमती निर्माण होतात, हें पाहणेंहि मोठें मनोरंजक होईल. उदाहरणार्थ, आपण पदार्थविज्ञानशास्त्र (Physics) घेऊं. या शास्त्राप्रमाणें प्रकाशाचा वेग दर सेकंदाला एक लक्ष ब्यांशीं हजार मैल आहे. एकाद्या वस्तूचा वेग प्रकाशाच्या वेगाइतका झाला तर त्या वस्तूंतील द्रव्य (matter) अनंत होतें , असा या शास्त्राचा एक सिद्धान्त आहे. म्हणजेच प्रकाशवेगानें प्रवास करणाऱ्या वस्तूचें अस्तित्व डोळ्याला—दृष्टीला—गोचर होणार नाहीं. इतकेंच नव्हें तर तिचें अस्तित्व कोणत्याच इंद्रियाला प्रतीत होणार नाहीं. याच मूलभूत विचारसरणीवर अवलंबून राहून शास्त्रज्ञांनीं या विश्वाचा व्यास आणि परिघ ठरविलेला आहे. अर्थातच व्यास आणि परिघ कसा ठरविला जातो हा उच्च गणितशास्त्राचा विषय आहे आणि प्रस्तुत लेखांत त्याची चर्चा करणें अप्रस्तुत ठरेल. पण निष्कर्षभूत म्हणून असें लक्षांत ठेवलें तरी पुरेसें होईल कीं विश्वाच्या मर्यादा आणि आकार निश्चित केल्यामुळें 'अनंत विश्वा'च्या कल्पना विज्ञानशास्त्राच्या दृष्टिकोणांतून केवळ श्रद्धाळूपणाच्या आहेत. विश्वाच्या मर्यादा सीमित असून तें सान्त आहे. निदान या मर्यादेबाहेर विश्व असल्यास तें इंद्रियगोचर नाहीं. म्हणून तें सत्य नव्हे असा पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांचा दावा आहे. विश्वाच्या या शेवटच्या मर्यादेपर्यंत एकादा परमाणु गेल्यास तो तेथून परत फिरेल आणि मग तो कोणत्या मार्गानें कसा परत येईल हा विज्ञानशास्त्रज्ञांच्या अभ्यासाचा विषय आहे.

## प्रत्येक शास्त्राच्या बुद्धिवादाच्या कल्पना भिन्न

अर्थातच वर वर्णन केलेली बुद्धिवादाची ही कल्पना पदार्थविज्ञानशास्त्राची आहे. पदार्थविज्ञान , गणित , रसायनशास्त्र आणि प्राणिशास्त्र हीं बुद्धिवादी शास्त्रांतील महत्त्वाचीं शास्त्रें आहेत. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं यांपैकीं प्रत्येक शास्त्राच्या बुद्धिवादाच्या कल्पना दुसऱ्या शास्त्राच्या बुद्धिवादाच्या कल्पनांशीं जुळत नाहींत. या शास्त्रांचें स्वतंत्र परीक्षण केल्यास हें दिसून येईल.

उदाहरणार्थ, आपण प्रथम गणितशास्त्रच घेऊं. गणितशास्त्र हें बुद्धिवादी शास्त्र नसून तें श्रद्धावादी शास्त्र आहे असें म्हणण्याचें धाडस सहसा कोणी करील असें वाटत नाहीं. कारण तर्कशुद्धता आणि सूक्ष्म बुद्धीचा विलास हीं गणितशास्त्राचीं दोन मूल वैशिष्ट्यें आहेत. पण विज्ञानशास्त्राची बुद्धिवादाची कल्पना गणितशास्त्राला








लावली तर या शास्त्राचे एका क्षणांत तीनतेरा वाजतील आणि हें शास्त्र केव्हांच श्रद्धाळू शास्त्रांच्या मालिकेंत जाऊन बसेल! हीच मोठी विनोदी घटना आहे! विश्व हें सान्त ( Finite ) आहे हा पदार्थविज्ञान-शास्त्राचा एक सिद्धांत आहे असें आपण वर पाहिलेंच. पण गणितशास्त्रानें 'अनंता '( Infinity )च्या कल्पनेचा आधार आपल्या सर्वच उपशास्त्रांतून घेतलेला आहे. बीजगणितांतील श्रेणी (Series), कॅल्क्युलस-मधली पदाची कल्पना ( Functions ) वगैरे कितीतरी कल्पना अनंताच्या कल्पनेवरच आधारलेल्या आहेत. त्याचप्रमाणें सर्वपरिचित भूमितिशास्त्राची सबंध उभारणीच मुळी अनंत रेषेच्या कल्पनेवर झालेली आहे. त्याचप्रमाणें समांतर रेषा, असिम्प्टिट, हायपरबोला वगैरे उच्च भूमितिशास्त्रांतील कल्पना अनंता-( Infinity ) च्या कल्पनेवरच उभारलेल्या आहेत हें गणितशास्त्रज्ञांना अपरिचित नाहीं. शिवाय भूमितिशास्त्राची सुरवात 'बिंदू'पासून होते. या बिंदूची काय व्याख्या आहे ? ज्याला अस्तित्व आहे पण आकार नाहीं तो बिंदु. अर्थातच असा बिंदु इंद्रिय-गोचर होऊं शकणार नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. गणितशास्त्राच्या आणखी खोल चर्चेंत शिरण्याचें कांहींच कारण नाहीं. आपणांला एवढेंच पहावयाचें आहे कीं पदार्थविज्ञानाच्या बुद्धिवादाच्या कल्पना गृहीत धरल्या तर सर्वच गणितशास्त्राला श्रद्धावादी म्हणावें लागेल हें उघड आहे.

शिवाय याहीपुढें जाऊन गणितशास्त्राच्या तुलनेनें विचार करून असें म्हणतां येईल कीं प्रत्यक्षानुभूतीवर पदार्थविज्ञानाचा जो फाजील विश्वास आहे तो तरी ज्ञानार्जनाच्या कामीं हितावह आहे काय ? उदाहरणार्थ , त्रिकोणाच्या तीन कोनांची बेरीज दोन काटकोन असते हा सर्वपरिचित असणारा सिद्धांत विज्ञानाच्या दृष्टिकोणांतून पाहिला तर कसा दिसेल ? विज्ञानशास्त्राचा विश्वास फक्त प्रत्यक्षानुभूतीवर. त्यामुळें कोन मोजून जेवढी बेरीज भरेल तेवढीच तीन कोनांची बेरीज असें विज्ञानशास्त्र मानणार. पण या तीन कोनांची बेरीज कधींतरी १८०° भरेल काय ? ती थोडीशी कमी तरी भरणार किंवा अधिक तरी भरणार. कारण तंतोतंत बरोबर कोन मोजणारें कोन-मापक यंत्र अजून निघालेलें नाहीं आणि तसें यंत्र निघालें असें मानलें तरी मानवी डोळ्यांमध्यें, दुर्बिणी-सारख्या यंत्रांच्या साहाय्यानें सुद्धां तंतोतंत माप घेण्याची शक्ति नाहीं. बरें दुसराहि असा एक तात्त्विक प्रश्न आहे कीं एका त्रिकोणाची बेरीज १८०° भरली तरी दुसऱ्या त्रिकोणाचीहि तितकीच भरली पाहिजे हा सिद्धान्त विज्ञानशास्त्र कोणत्या आधारानें सिद्ध करणार आहे ? यासाठीं विज्ञानाला गणितशास्त्राचीच कांस धरावी लागेल. तिहींपैकीं एकहि कोन न मोजतां गणित-शास्त्र आनुमानिक सिद्धतेनें असें सिद्ध करूं शकतें कीं जगांतील कोणत्याहि त्रिकोणाची बेरीज दोन काटकोनच असली पाहिजे. ती याहून कमीहि असणार नाहीं किंवा जास्तहि असणार नाहीं. आतां प्रश्न असा आहे कीं प्रत्यक्षानुभूतीवर अवलंबून राहणाऱ्या विज्ञानाचा बुद्धि-वाद अधिक श्रेष्ठ कीं प्रत्यक्षावर न राहतां अनुमानावर अवलंबून राहणाऱ्या गणितशास्त्राचा बुद्धिवाद अधिक श्रेष्ठ ? या प्रश्नाचें उत्तर देणें फारसें कठीण आहे असें नाहीं.

गणितानंतर रसायनशास्त्राकडे आपण पाहिलें तर आपणाला काय आढळेल ? वास्तविक रसायनशास्त्र म्हणजे पदार्थविज्ञानशास्त्राच्याच अंतर्भूत. त्यामुळें त्याचा स्वतंत्र असा विचार करण्याचें फारसें कारण नाहीं. पण एक गोष्ट मात्र नमूद करणें आवश्यक वाटतें कीं या शास्त्राला पदार्थाचें बहुधा विच्छेदन (analysis) करतां येतें पण विच्छेदन केल्यानंतरच्या घटकावयवां-तून मूळ पदार्थ तयार करतां येतोच असें नाहीं. सामान्यतः तोडतां येतें पण जोडतां येणें मात्र फारच कठीण असतें.

यानंतर प्राणिशास्त्राचा विचार करूं. या शास्त्राची वाढच मुळीं एका गृहीतकृत्यावर झालेली आहे. शरीरांतील लहानांत लहान पेशी ( cell ) हाच या शास्त्राचा आरंभबिंदु आहे. या पेशीची व्याख्याच अशी आहे कीं ही पेशी यापेक्षां लहान केली म्हणजे तिचे तुकडे केले तर ती मरते. म्हणजे तिची वाढ होण्याची शक्ति नष्ट होते. अर्थातच ही मूलभूत पेशी तयार कशी होते, त्या पेशीमध्यें वर्धमान होण्याची शक्ति कोठून येते, ती कापल्यानंतर तिच्यांतील वर्धमान होण्याची शक्ति कां नष्ट होते, वगैरे मूलभूत प्रश्न या शास्त्राला नडत नाहींत. अर्थातच एका गृहीत गोष्टी-वरच या शास्त्राची सरळच उभारणी असल्यामुळें हें








शास्त्र बुद्धिवादाचा फारसा टेंभा मिरवीत नाहीं.

बुद्धिवादी समजल्या जाणाऱ्या कांहीं शास्त्रांच्या बुद्धिवादाच्या कल्पना आपण पाहिल्या आणि आपणाला असेंहि आढळून आलें कीं पदार्थविज्ञानशास्त्राच्या बुद्धिवादाच्या कल्पना गृहीत धरल्या तर गणिशास्त्र बुद्धिवादी ठरूं शकत नाहीं. आणि गणितशास्त्राच्या बुद्धिवादाच्या कल्पना गृहीत धरल्या तर पदार्थविज्ञानाच्या कल्पनांना फारसें अस्तित्व रहात नाहीं. यावरून असें लक्षांत घेणें आवश्यक आहे कीं आपणाला अतीव बुद्धिवादी म्हणवून घेणाऱ्या आधुनिक शास्त्रांच्या बुद्धिवादाच्या कल्पना मुळांत एक नाहींत तर परस्परविरोधी आहेत.

वरील चर्चेवरून, बुद्धिवादाविषयीच्या कल्पना निश्चित करतांना खालील महत्त्वाच्या गोष्टी लक्षांत घेणें आवश्यक ठरतें : ( १ ) अमुक एक शास्त्र किंवा अमुक एक विचारसरणी बुद्धिवादी आहे, असें म्हटल्यानें निश्चित असा कोणताच बोध होत नाहीं. म्हणजेच बुद्धिवादी म्हटलीं जाणारीं शास्त्रें इतर शास्त्रांहून श्रेष्ठ आहेत किंवा इतर शास्त्रें त्याहून कनिष्ठ आहेत असा उच्चनीच दर्जा लावणें अशास्त्रीय आहे. (२) प्रत्येक बुद्धिवादी शास्त्राच्या स्वतंत्र अशा बुद्धिवादाच्या कल्पना असतात. आणि त्या कल्पना मान्य करूनच त्या त्या शास्त्राला बुद्धिवादी म्हणतां येतें. ( ३ ) एका शास्त्राच्या बुद्धिवादाच्या कल्पना दुसऱ्या शास्त्राला लावल्यास, दुसरें शास्त्र पहिल्याच्या दृष्टीनें श्रद्धावादी ठरू शकेल. पण याचा अर्थ दुसरें शास्त्र मुळांतच बुद्धिवादी नाहीं असा करतां येणार नाहीं.

## जडवादाची कल्पना व स्वरूप

'जडवाद' या नांवानें ओळखलें जाणारें तत्त्वज्ञान नेहमीं बुद्धिवादाचा दावा सांगते, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. वरील चर्चेच्या अनुरोधानें जडवादाचा हा दावा कितपत खरा आहे हें आतां यापुढें तपासावयाचें आहे.

'जडवाद' या शब्दानें दर्शविल्या जाणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या कल्पना मुळांतच फारशा सुस्पष्ट किंवा निश्चित आहेत असें नाहीं. पण बहुतांशीं 'ईश्वरवादा'च्या विरोधी अर्थाचा म्हणून हा शब्द वापरण्यांत येतो. म्हणजेच 'जडवाद' आणि नास्तिक-वाद हे समानार्थक शब्द म्हणून वापरले जातात. पण जडवादाचे पुरस्कर्ते "ईश्वराचें अस्तित्व न मानणें म्हणजेच जडवाद" अशी जडवादाची अकरणात्मक (negative) व्याख्या मान्य करायला फारसे उत्सुक असत नाहींत. जडवाद्यांच्या दृष्टिकोनांतून जडवादाचें करणात्मक (positive) स्वरूप थोडक्यांत खालीलप्रमाणें सांगता येईल.

विज्ञानशास्त्राच्या नियमांना अनुसरून विश्वांतील व्यवहार चालतात. जड पदार्थांच्या संयोगानेंच विश्वांतील वर्धन आणि नाश हीं होतात. अर्थातच ज्ञानेंद्रियांना गोचर अशा सृष्टींतील व्यापारांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं, विश्वाबाहेरील अमूर्त अव्यक्त परमेश्वराची कल्पना करणें इष्ट नाहीं. कारण अशा प्रकारच्या कोणत्याच कल्पनेचें ज्ञान ज्ञानेंद्रियांना असणार नाहीं, होऊं शकणार नाहीं. म्हणून विश्वाच्या व्यापारांचें जें ज्ञान, ज्ञानेंद्रियांच्या मर्यादेंत राहून होण्यासारखें आहे तेंच खरें ज्ञान होय आणि यापलीकडे कल्पनेवर आधारलेल्या ईश्वरीय तत्त्वज्ञानावर आधारलेलें ज्ञान सत्य नव्हे, आणि सत्य असूंहि शकणार नाहीं.

या भूमिकेच्या आधारावरच जडवाद्यांचा असा दावा आहे कीं विज्ञानशास्त्रानें सिद्ध झालेल्या ज्ञानालाच आपण सत्य मानीत असल्यामुळें आपण संपूर्ण बुद्धिवादी आहोंत आणि विज्ञानशास्त्राच्या ज्ञानेंद्रियगोचरत्वाच्या कल्पनेला मुळांतच धाब्यावर बसवून, कल्पनेनें निर्माण केलेल्या ईश्वरावर आपलें तत्त्वज्ञान आधारणारे अध्यात्मवादी लोक श्रद्धावादी किंवा भोळे आहेत.

वरील भूमिकेशीं सुसंगत राहूनच जडवाद्यांनीं केलेला बुद्धिवादाचा दावा आणि विशेषतः ईश्वरवाद्यांपेक्षां आपण अधिक श्रेष्ठ आणि अधिक बुद्धिवादी असल्याचा त्यांचा अभिप्राय या दोन्हींहि गोष्टींमध्यें कितपत तथ्य आहे हा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

वर आपण पाहिलेंच कीं बुद्धिवादाचा दावा सांगणाऱ्या प्रत्येक शास्त्राला आपल्या बुद्धिवादाच्या कल्पना प्रथम स्पष्ट कराव्या लागतात. जडवादाच्या बुद्धिवादाच्या कल्पना पदार्थविज्ञानाच्या बुद्धिवादाच्या कल्पनांशीं तंतोतंत जुळतात हें अगदीं उघड आहे. म्हणजे ज्ञानेंद्रियें, बुद्धि आणि अनुमान यांच्या साहाय्यानें सत्याचें शोधन करणें हाच जडवादाचा मार्ग आहे हेंहि सुस्पष्ट आहे. या दृष्टीनें मुख्य



अनुक्रमणिका





प्रश्न असा आहे कीं ज्या बुद्धिवादाचा जडवादानें पुरस्कार केलेला आहे, त्याच बुद्धिवादाच्या कल्पनां-प्रमाणें जडवादाचा बुद्धिनिष्ठतेचा दावा कितपत तर्क-शुद्ध आहे ?

जडवादी ईश्वर मानीत नाहींत. कारण ईश्वर ही कल्पना ज्ञानेंद्रियगोचर नाहीं. ही विचारप्रणाली पूर्ण-पणें सुसंगत आहे यांत मुळींच शंका नाहीं. पण या मूलभूत गृहीत कृत्याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे जडवादाला "हें विश्व मुळापासूनच आहे; त्याला कोणी निर्माण केलें नाहीं; तें स्वयंभू आहे" हें तत्त्वहि गृहीत धरावें लागतें. किंबहुना जडवादाची उभारणीच विश्वाच्या या 'स्वयंभूपणा'च्या कल्पनेवर झालेली आहे. आतां ही कल्पनाच मुळांत बुद्धिवादी आहे किंवा काय या मूलग्राही प्रश्नाचा विचार करणें आवश्यक आहे.

## विश्वांतील वस्तूंचें वर्गीकरण

विश्वाची रचना पाहिली तर त्यांतील वस्तूंचें दोन जातींमध्यें विभाजन करतां येईल: (१) जडवस्तु आणि (२) चेतनवस्तु. ज्यांना स्वयंप्रेरणा नसते त्या जडवस्तू आणि ज्यांना स्वयंप्रेरणा असते म्हणजेच ज्यांना जीव असतो त्या चेतनवस्तू. 'ज्ञान', 'समजणें', 'वाटणें' या भावना चेतनत्वाच्या द्योतक आहेत. थोड-क्यांत असें म्हणतां येईल कीं जडवस्तूंना ज्ञान नसतें आणि त्या स्वयंप्रेरणेनें वाढूं शकत नाहींत. चेतनवस्तूमध्यें ज्ञान असतें आणि सर्व सजीव वस्तच चेतन असल्या-मुळें त्यांना जन्म, वाढ आणि मरण अशा तीन उपाधी असतात. याच व्याख्येप्रमाणें दगड हा जड आहे. त्याला ज्ञान नसतें, तो वाढत नाहीं. बाह्य शक्तीखेरीज तो आपण होऊन जागचा हलूं शकत नाहीं. आणि त्याला स्वतंत्र मरण नसतें. या उलट वनस्पति आणि प्राणी या चेतनवस्तू आहेत. त्यांना जन्म असतो त्यांची वाढ होते आणि त्यांना मरणहि असतें.

या वस्तूंच्या वर्गीकरणांतूनच आणखी एकदोन महत्त्वाचे मुद्दे उपस्थित होतात. जडपदार्थ स्वयंप्रेरणेनें एकत्र येऊं शकत नाहींत. बरें, ते एकत्र आणले तरी त्यांच्या संयोगानें चेतनायुक्त पदार्थ निर्माण होत नाहीं. त्याचप्रमाणें दोन जड पदार्थांच्या संयोगानें तिसरा नवीन पदार्थ – निराळें वजन, आकार, चेतनायुक्तता, वगैरे गुणांनीं युक्त असा – निर्माण होत नाहीं. म्हणजेच 'वर्धमानता' हा जड पदार्थामध्यें मूलभूत असणारा गुणधर्म नाहीं किंवा जडपदार्थांच्या संयोगानेंहि हा गुण निर्माण होत नाहीं. जगाच्या मूळ स्थितीमध्यें जी वाढ होते, जी वर्धमानता येते, ती अशा तऱ्हेनें जडपदार्थांच्या संयोगानें झालेली नाहीं. जगाच्या सातत्या-(continuity) करितां चेतनायुक्त, प्राणयुक्त, पदार्थांच्या संयोगाची जरूरी आहे. यावरून खालील महत्त्वा-च्या गोष्टी स्पष्ट होतील: (१) जड पदार्थांच्या संयोगानें वर्धमानता निर्माण होत नाहीं. (२) जड पदार्थांच्या संयोगानें सजीव पदार्थ निर्माण होत नाहीं. (३) जड पदार्थांच्या संयोगानें 'ज्ञानयुक्त' पदार्थ निर्माण होत नाहीं. (४) वर्धमानता (वाढण्याचा गुण), सजीवता आणि ज्ञान या गुणांनीं युक्त अशा पदार्थांच्या निर्मितीसाठीं चेतनायुक्त पदार्थांच्याच संयोगाची आवश्यकता असते.

वरील चार गोष्टी लक्षांत ठेवल्या म्हणजे विश्व हें स्वयंभू आहे या जडवाद्यांच्या मूलभूत कल्पनेचे दोन भाग पडतात. (१) विश्वांतील जडवस्तू स्वयंभू आहेत. (२) विश्वांतील चेतनवस्तू स्वयंभू आहेत.

यांपैकीं पहिल्या विधानाविषयीं असें म्हणतां येईल कीं जडवस्तूंचे पदार्थविज्ञानाप्रमाणें जे मूळ घटक आहेत त्यांच्यापासून सर्व विश्व निर्माण झालें हें ठीक आहे. पण हे मूळ घटकच मुळांत कसे आणि कशापासून निर्माण झाले याचें जडवादाजवळ कोणतेंच उत्तर नाहीं. आणि या अज्ञानाचें गोंडस नांव म्हणजेच "जडवस्तू स्वयंभू आहेत" हा जडवादाचा पहिला सिद्धान्त आहे. निदान हा पहिला सिद्धांत ज्ञानेंद्रिय-गोचरत्वाच्या बुद्धिवादाच्या मर्यादेंत कसा बसतो हें समजणें अशक्य आहे.

त्याचप्रमाणें वरील दुसऱ्या विधानाविषयीं असें म्हणतां येईल कीं एकादा मुलगा खुर्चीवर बसलेला असावा आणि एकाद्यानें असें सांगावें कीं हा मुलगा प्रथमपासूनच येथें स्वयंभू आहे– हें विधान जितकें हास्यास्पद आहे तितकेंच जडवाद्यांचें हें दुसरें विधान हास्यास्पद आहे. चेतनवस्तू स्वयंभू कशा असतील, सजीव पदार्थ आपोआपच कसे निर्माण होऊं शक-तील, हे बुद्धिवाद्यालाच काय पण श्रद्धावाद्यालासुद्धां समजणार नाहीं. वृक्षबीजन्याय हा सुप्रसिद्ध आहे. आधीं वृक्ष कीं आधीं बीज ? बीज प्रथम मानलें तर तें वृक्षाशिवाय कसें झालें ? आणि वृक्ष प्रथम मानला



अनुक्रमणिका






तर तो बीजाशिवाय कसा झाला ? मुळांतच सर्व पदार्थ जड होते असें मानलें तर त्यांच्यांतून चेतना-युक्त बीज कसें तयार झालें ? हेच प्रश्न सर्वच सजीव प्राण्यांविषयीं विचारतां येतील आणि या सर्वच प्रश्नांचीं जडवादाचीं बुद्धिवादी – पंचज्ञानेंद्रियगोचरत्वाच्या मर्यादेंत राहून – उत्तरें काय आहेत हा एक कधींहि न सुटणारा प्रश्न आहे.

अशा तऱ्हेनें जड विश्वाच्या स्वयंभूपणाच्या कल्पना ज्ञानेंद्रियगोचर बुद्धिवादानें कशा सिद्ध होतात हें कळणें फारच कठीण आहे. जडवस्तू स्वयंभू कशा हें बुद्धिवादानें समजणें जितकें कठिण आहे तसेंच सजीव वस्तू स्वयंभू कशा हें समजणें तितकेंच किंबहुना त्याहूनहि अधिक कठीण आहे.

या विवाद्य मुद्द्यांवर जडवाद्यांकडून अशीं विधानें करण्यांत येतात कीं (१) चेतन हें जडाचेंच सूक्ष्म स्वरूप आहे; (२) ज्या गोष्टी आम्हांला समजत नाहींत त्या बाबतींत आम्हीं आपलें अज्ञान मान्य करतों, पण इतर शास्त्रांनीं दिलेलें 'ज्ञानेंद्रिय-अगोचर' स्पष्टीकरण आम्हीं मान्य करीत नाहीं.

हे दोन मुद्दे जडवादाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे आहेत चेतन हें जडाचें सूक्ष्म स्वरूप आहे असें म्हणतांना जडसृष्टीच्या संघर्षांतून चेतन पदार्थ निर्माण होतात असें जडवादाला सुचवावयाचें आहे. पण ही गोष्ट जडवादाला अजून सिद्ध करतां आलेली नाहीं. कारण जड पदार्थ घेऊन त्यांच्यांतून चेतन पदार्थ जोंपर्यंत विज्ञानशास्त्राला तयार करतां येत नाहींत, निरनिराळ्या जडवस्तूंतून एकादा उंदीर किंवा एकादा ढेकूणसुद्धां तयार करणें जोंपर्यंत शक्य झालेलें नाहीं तोंपर्यंत 'जडपदार्थाचें सूक्ष्म स्वरूप चेतन आहे' हें विधान प्रत्यक्षानुभूतीवर आधारलेलें नसल्यामुळें, जडवादाच्या बुद्धिवादाच्या कल्पनेप्रमाणेंच अबुद्धिवादी आहे ! आणि म्हणून वरील तत्त्वाला शुद्ध श्रद्धा असेंच सार्थ नांव द्यावें लागेल. फारतर त्याला पुरोगामी श्रद्धा असें म्हणावें. पण त्याला 'बुद्धिवादी' असें विशेषण लावणें मात्र केव्हांहि बरोबर होणार नाहीं.

वरील दुसऱ्या विधानावर जडवाद्यांची फारच मदार असते. आपलें अज्ञान जडवाद मान्य करतो ही निःसंशय आनंदाची गोष्ट आहे. पण 'ज्ञानेंद्रियगोचर' तेवढेंच ज्ञान हा जो जडवाद्यांचा अट्टहास आहे त्याविषयीं आपण वर बरीच चर्चा केलेली आहे. या अट्टहासाचा परिणाम म्हणून गणितशास्त्रसुद्धां बुद्धिवादी शास्त्रांच्या मालिकेंतून कसें बाहेर फेंकलें जातें हेंहि आपण पाहिलें. याचाच अर्थ असाहि कीं ज्ञानेंद्रिय-गोचरत्व बुद्धिवादानें मानलेंच पाहिजे असें मुळींच नाहीं. म्हणजेच जडवाद्यांच्या या दुसऱ्या तत्त्वाला ऊर्फ हट्टाला 'पुरोगामी श्रद्धा' असेंच नांव द्यावें लागेल.

## जडवाद आणि अध्यात्मवाद

वरील चर्चेनंतर आपणाला जडवादाच्या आणि अध्यात्मवादाच्या ज्या मूलभूत कल्पना आहेत त्यांतील बुद्धिवादाची तुलना करणें शक्य होईल. जडवाद जड आणि चेतन वस्तूंना स्वयंभू मानतो. विश्वांतील प्राणी वृक्षबीजन्यायानें कसे निर्माण झाले याचें ज्ञानेंद्रिय-गोचर स्पष्टीकरण नसल्यामुळें तेहि स्वयंभूच आहेत किंवा ते स्वयंभू जडांतूनच निर्माण झाले आहेत असें मानण्यालेरीज जडवादाला गत्यंतरच नसतें. याउलट यापैकीं कोणतीच वस्तु अध्यात्मवादी स्वयंभू मानीत नाहीं. जड आणि चेतन पदार्थ निर्माण करण्याचें सामर्थ्य असणारी अशी एक शक्ति अध्यात्मशास्त्र स्वयंभू मानतें. वर आपण पाहिलें कीं चेतना, वर्धमानता आणि ज्ञान या गोष्टी विश्वाच्या वाढीला कारणीभूत आहेत. यापैकीं एकहि गुणधर्म जडपदार्थांत नसतो. त्यामुळें जड विश्व स्वयंभू मानल्यास त्यापासून निर्माण होणाऱ्या सृष्टींतील पदार्थांत मुळांत जडांत नसणारे हे गुण येतील हें विसंगत असल्यामुळें, अध्यात्मशास्त्रानें आपल्या स्वयंभू शक्तीमध्यें या तिन्हीं गुणांची स्थापना केलेली आहे.

जडवाद काय किंवा अध्यात्मवाद काय, या दोहोंनाहि मूलभूत स्वयंभू अशी एक गोष्ट मानावीच लागते. पण प्रश्न असा आहे कीं अचेतन आणि सचेतन दोन्हीं वस्तू मुळांतच स्वयंभू आहेत असें मानणारा जडवाद हा बुद्धिवादी आहे कीं चेतन आणि अचेतन वस्तु निर्माण करण्याचें सामर्थ्य असणारी एक शक्ति स्वयंभू मानणारा अध्यात्मवाद अधिक बुद्धिवादी आहे ? जडवादाच्या म्हणजेच विज्ञानाच्या दृष्टीनें दोन्हीहि कल्पना ज्ञानेंद्रियगोचर किंवा प्रत्यक्षानुभूतीवर आधारले-ल्या नसल्यामुळें अबुद्धिवादी आहेत. असें असतांना अध्यात्मापेक्षां बुद्धिनिष्ठतेचा मक्ता आपणाकडेच अधिक आहे असा अट्टहास जडवादानें कां करावा हें समजणें








फारच कठीण आहे.

सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें पाहिलें तर ज्या विज्ञान-शास्त्रावर जडवादाची एवढी मदार आहे त्या विज्ञानाची आणि अध्यात्माची मुळांतच विरोधी भूमिका आहे कीं काय हाच मूलभूत विचाराचा प्रश्न आहे. विश्वांतील पदार्थमात्रांचे (१) जडवस्तु आणि (२) चेतनवस्तु असे दोन विभाग पडतात हें आपण पाहिलें. विज्ञान हें जडवस्तूंचें शास्त्र आहे आणि अध्यात्म हें चेतनवस्तूंचें शास्त्र आहे. दोन किंवा अधिक जडवस्तू एकत्र आल्या तर त्यामध्यें कोणकोणत्या जडशक्ती कार्य (गुरुत्वाकर्षण वगैरे) करतात, जडवस्तूंचे घटकावयव कोणते वगैरे जडवस्तूंच्या गुणधर्माबद्दल कांहीं ठोकळ नियम सांगून जडवस्तूंचा सखोल अभ्यास करणें हा विज्ञानाचा उद्देश आहे. ज्ञानयुक्त चेतना हा विज्ञानाचा विषय नाहीं. तो अध्यात्माचा विषय आहे. ज्या ठिकाणीं सचेतनाचें क्षेत्र सुरू होतें त्या ठिकाणीं विज्ञानाचें क्षेत्र संपतें. अशा तऱ्हेनें विज्ञान आणि अध्यात्म हीं निरनिराळया क्षेत्रांत कार्य करणारीं शास्त्रें आहेत. त्यांमध्यें आपापसांत विरोध अगर भांडण असण्याचें कांहींहि कारण नाहीं. ही मूलभूत गोष्ट जर लक्षांत ठेवली तर, विज्ञानाश्रित जडवाद आणि विज्ञाननिरपेक्ष अध्यात्मवाद यांत कधींच चुरस लागणार नाहीं. दोनहि शास्त्रांच्या मूल-भूत कल्पना निराळया आहेत. दोन्हीं शास्त्रांचे सत्य-शोधनाचे मार्ग भिन्नभिन्न आहेत. ज्ञानेंद्रियांना अगो-चर अशा मूलभूत कल्पनांचा आधार दोन्हीं शास्त्रांना घ्यावा लागतो. या दृष्टीनें दोन्हीं शास्त्रांनीं आपलें दुसऱ्यावर श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणें मनोरंजक असलें तरी त्यापासून कोणताच निर्णय निष्पन्न होणार नाहीं हें निर्विवाद आहे.

---

## गौप्य स्फोट !

विस्मयकारी ती घटना
गहन गूढ तें उकलेना !

' भंग पावला रवि ' म्हणती
उडती शकलें दूर किती
युगें लोटलीं युगें किती
फिरे एक तें तप्त अती
झालें मग तें शांत जरा
येइ कवच त्या म्हणति धरा
कंप पावणें
स्फोट भडकणें
विराम कधिं ना, खेळ असे
पर्वत, द्वीपें निर्मितसे
दूर तिमिर हो, गोल खुला
वात वेष्टितो मग त्याला
भूमि अब्धि मग स्थिरावले
सुनील चमके गगन भलें
पाउस मग ये भेटीला
पुलकित करि तो धरणीला
आनंदाचें
फल मग साचें
लागे सरिता धांवाया
वृक्ष, सुमलता डोलाया

सजीव खळबळ जलोदरीं
शंखमत्स्य ते किती तरी
सूक्ष्म जीव तो प्रथम स्फुरे
उत्क्रान्तीचें मग वारें
अजस्र प्राणी भूवरतीं
पन्नग भारी सरपटती
आले गेले
दुजे जन्मले
बांधव त्यांचे सौम्य जरा
व्यापिति आतां सकल धरा

सस्मित झाल्या सर्व दिशा
निसर्ग आतुर होत पिसा
भूतें पंचक कर जोडी
सेना सारी सज्ज खडी
पूर्वसिद्धता पूर्ण यदा
गूढ उलगडें गहन तदा
त्या दरबारीं
ये ललकारी
' मानव तेथें अवतरला
राजा विश्वाचा आला '

— (कै.) शं. रा. देशमुख







श्री. सुन्दरम्— अनु. : प्रा. गोवर्धन पारीख

# माजा वेलाचा मृत्यु !

एकाद्या प्राचीन कुलपतीच्या थाटांत माजा वेला बसला होता. आकाशांत अदृश्य होणाऱ्या शाखांच्या तपोवनांतील वृक्षासारख्या उंचच उंच 'टॉवर'ची सावली त्याच्या डोक्यावर पडली होती. त्याच्या भोंवतीं तीन-तीन चार-चार पिढ्यांचा त्याचा परिवार इतस्ततः पसरला होता. त्याच्या मुलीच्या मुलीचीं दोन जुळीं मुलें त्याच्या खांद्याला लोंबकळलीं होतीं. शेजारींच साठ वर्षांचा त्याचा एक मुलगा गुडघ्यावर डोकें टेकून बसला होता. पलीकडे पन्नाशींतल्या दुसऱ्या मुलाच्या दोघी सुना आपल्या तान्ह्या मुलांना पाजीत गाडग्यांतून निरनिराळे पदार्थ वाडग्यांत काढून ठेवीत होत्या. इतर अनेक स्वजन नक्षत्राच्या ताऱ्यांप्रमाणें सभोंवतीं पसरून बसले होते. माजा वेलाला त्यांची संख्याहि सांगतां आली नसती !

हिवाळ्याचे दिवस. संध्याकाळचा साताचा सुमार होता. तपोवनांतील यज्ञधूमाप्रमाणेंच कारखान्यांचा धूर सर्वत्र पसरला होता. यज्ञधूमाप्रमाणेंच याहि धुरानें डोळे चुरचुरत होते. यज्ञधूमाप्रमाणेंच याहि धुरांत वास होता. पण तो गटारांचा, सुगंधित हवींचा नव्हे ! शहराच्या कोटाबाहेर मोटारींच्या अड्ड्याजवळ उंच टॉवरलगतच्या फूटपाथवर रोजच्या सारखीच आजहि माजा वेलाची संतति गोळा झाली होती.

पेठेंतील लोकांची संध्याकाळची जेवणाची वेळ झाली म्हणजे माजा वेलाची हीं मुलेंबाळें लहान लहान गाडगीं डोक्यावर घेऊन निघायचीं, " मायबाप, कांहीं द्या होऽ " असले तीक्ष्ण पण गोड सुरांत हेल काढीत गल्त्यागल्ल्यांतून हिंडायचीं. आणि आपापलीं गाडगीं भरत आलीं कीं टॉवरजवळच्या अड्ड्याकडे मंद पावलांनीं परत फिरायचीं. मोठीं माणसं भाजीपाल्याच्या किंवा पेलेबरण्यांच्या टोपल्या घेऊन किंवा तशींच आधींच येऊन बसत. जसजशीं गाडगीं परत येत तसतशी त्यांतील पदार्थांची वाट लागे. आणि शेवटीं जें थोडेंफार उरें तें घरीं पडून राहिलेल्या म्हाताऱ्याकोताऱ्यांसाठीं नेण्यांत येई.

आज माजा वेलाला थोडासा ताप आला होता. म्हणून त्याला सगळे ' नको ' म्हणत होते; पण तो यायला निघाला. कालच एका लग्नघरांतून मिळालेल्या पदार्थांमुळें त्या लग्नाबद्दल त्याचं चांगलं मत झालं होतं. आणि तें लग्न, त्याची वरात, जेवणावळ – सगळं कांहीं बघण्याची त्याची उत्सुकता वाढली होती.

" माजा दादा, तुम्हांला ताप भरलाय्. कशाला येतां उगीच ? " निघतां निघतां त्याचा पुतण्या म्हणाला.

" अरे तापाची काय माय व्यालीय् ? " माजा वेलानें खोकत सांगितलें आणि काठीच्या आधारानें, मोटारींनीं भरलेले रस्ते ओलांडीत व हॉटेलांची रोषनाई पहात टॉवरच्या भिंतीजवळ येऊन टेकला. त्याला किंचित् श्वास चढला, थोड्याच वेळांत तो पुनः बसला.

त्याच्या मुलीच्या मुलीचीं दोन जुळीं मुलं कुलंग्यासारखीं येऊन त्याला बिलगलीं, त्याच्या मिशांचे केस ओढूं लागलीं, खांद्याला लोंबकळलीं आणि मांडीवर मजेनें खेळूं लागलीं. आज त्याला कसला उत्साह आला होता कोण जाणे ! पण पुनः एकदां सगळें शहर हिंडून पहावें असें त्याला वाटलें.

मुलांना खेळवीत, आजूबाजूच्या बायकापोरांचं बोलणं ऐकत, माजा वेला रस्त्यानें चाललेले स्त्रीपुरुषांनीं भरलेले खटारे, सायकली, फटफट्या, मोटारी वगैरे पाहूं लागला.

---

**श्री. सुन्दरम्** यांच्या 'माजा वेलानुं मृत्यु' या गुजराती लघुकथेचा हा अनुवाद आहे. **श्री. सुन्दरम्** – ( त्रिभुवनदास पुरुषोत्तमदास लुहार ) – हे गुजरातचे विख्यात साहित्यिक आणि प्रथितयश कवि असून, ' काव्यमंगला ', ' वसुधा ' इत्यादि काव्यसंग्रह, ' खोलकी अने बीजी वातो ' हा कथासंग्रह, ' दक्षिणायन ' हें प्रवासवर्णन, ' अर्वाचिन कविता ' हा टीकात्मक प्रबंध इत्यादि त्यांचें साहित्य प्रसिद्ध आहे. त्यांचें वास्तव्य अरविंद आश्रम, पॉंडिचरी येथें आहे. – ' दक्षिणा ' या त्रैमासिकाचें ते संपादन करतात.—का. सं.








## माजा वेलाचा मृत्यु !

मोटार-अड्ड्यावर एक माणूस सिगरेट ओढीत होता. तिचा गोड धूर माजा वेलाच्या नाकांत शिरला. त्याच्या तोंडाला पाणी सुटलें आणि तो त्या झुरके मारणाराकडे टक लावून पाहूं लागला. सिगारेट ओढणारानें ती थोडीशी ओढून टाकून दिली. माजा वेलानें लगेच एका पोराला तिकडे पिटाळलें.

"जारे लल्या! ती विडी घेऊन ये पाहूं".

"सिगारेट, दादा!"

"हॉ. शिगरेट! मोठा शहरी झालाय् बेटा". माजा वेलानें आपला गोड असंतोष व्यक्त केला. आणि सिगारेट आणणाऱ्या त्या पोराला मधूनमधून झुरका देत स्वतः ती पिऊं लागला आणि भोंवतीं बसलेल्यांना विचारूं लागला :

"ती विजी नाहीं दिसत", "मलकाला कुठं पाठवलंय?", "म्हालडी, तूं तर अगदीं पुरेपुर शेटाणीच दिसतेस कीं", "ए भाणकी, तुझी पोरगी आज इतकी कां रडतेय?", "ती म्हातारी आजारी पडलीय् ना?" "ए, तो मगिया इस्पितळांत मेला म्हणे?"

त्याची साठीच्या घरांत पोहोंचलेलीं 'मुलं' त्याच्या प्रश्नांचीं जुजबीं उत्तरं देऊन पुनः आपल्या गप्पांत गर्क होत होतीं. पण शेवटीं माजा वेलाच्या एका प्रश्नानें सगळेच चमकले! "कायरे, ते डाका घालायला गेलेत त्यांचं तुम्ही कुणींच कसं कांहीं सांगत नाहीं मला?"

जवळच बसलेला पांढरे केस झालेला त्याचा मुलगा कान टंवकारीत म्हणाला: "जरा हळु बोला ना! हा पोलीसवाला इथं हिंडतोय".

इतक्यांत अड्ड्यावर येऊन उभ्या राहिलेल्या एका मोठ्या घराएवढ्या मोटारींतून एक पोलीस अधिकारी उतरला आणि कमरेचा दंडा हालवीत निघून गेला. त्याच्याकडे तुच्छतेनें पहात माजा वेला हळूंच म्हणाला:

"मोठा पाहिलाय् पोलिसवाला. असे सतरा खिशांत घालून हिंडलोंय् आम्ही!"

"दादा, तुमच्या डाक्याची एकादी गोष्ट सांगा ना!" असें म्हणत त्याचा एक नातू त्याला बिलगला. आणि माजावेलानें, कितव्यांदा कोण जाणे, शहरांत घातलेल्या डाक्याची गोष्ट सांगायला सुरवात केली. मोठ्या माणसांना ही कथा जुनी झाली असल्यामुळें तीं आपसांत गप्पांत गर्क होतीं. मात्र त्यांनीं; म्हाताऱ्याला सांगितलें "जरा हळु बोला हळूं!"

माजा वेला खालच्या आवाजांत गोष्ट सांगूं लागला. पण त्याची सांगण्याची ढबच अशी कांहीं होती कीं गप्पा मारणारांचा कान तिकडेच लागला होता.

आणि माजा वेला भूतकाळाचा उकल करूं लागला:- "गावांतून शहरांत आम्ही आलों तेव्हां या कोटाबाहेर वेशीपाशींच पडून रहायचे; दांतणाच्या काड्या विकायचे, आणि उष्टं खरकटं मागून आणायचे अन् खायचे. एकटादुकटा कुणी दिसला तर त्याला लुबाडायचे देखील! या वेशीपुढं नाहीं हं! या शहराला सतरा वेशी आहेत. दुसऱ्या कुठल्या वेशीजवळ असं करायचं. इथं तर गरीब गाईसारखंच राहिलं पाहिजे, नाहीं कां? अन् हा टॉवर आहे ना, इथें कांहींसुद्धां नव्हतं. कांहीं नाहीं म्हणजे एक खोल खड्डा होता. तिकडे लोकं परसाकडे जायचे, उष्टींखरकटीं टाकायचे, पत्रावळी फेंकायचे. आमचें ठरलें होतें कीं या वेशीशीं कांहीं करायचें नाहीं म्हणून. पण एकदां एक लग्न होतें. अन् तुझी आजी उष्टीं घेऊन येत होती. ती म्हणाली कीं हजारेक रुपयांचे दागिने घातलेली एक तेलीण पत्रावळी टाकायला येतेय. मी खूप सांगितलें पण तो नगुडिया कांहीं ऐकना. आणि अखेरीस त्यानें लुबाडलें तिला. पण ती लागली ओरडायला. मग काय करणार? दाबला गळा न् दिली फेकून खड्ड्यांत, अन् गेलों पळून सगळे. हं. मागून त्याच्या वाटणीचे डाग विकतांना आमच्यांतला एक पकडला गेला. पण माझ्या वाटणीचे मी गाळूनच टाकले होते. मग आम्हांला दोन दोन वर्षांची सजा झाली. हा आमचा पहिला डाका", असें म्हणत माजा वेलाने आपली दुसरी, तिसरी, चौथी अशा पराक्रमकथा सांगायला सुरवात केली.

पोरं 'आ' वासून ऐकत होतीं. "दादा, हा टॉवर इथें नव्हता?", "अंहं.", "अन् दादा, ती मोठी बत्ती पण नव्हती?" "नाहीं बाळा. हे रस्तेहि नव्हते, इथं हातहातभर धूळ सांठलेली असायची. आणि कुत्रेहि खूप होते. सारखे 'भूः भूः' करायचे. आम्हाला मात्र ओळखायचे. अन् त्या दिवसांत लोकांचें खाणेंपिणें, कपडेलत्ते तरी काय! अरे आतां काय खातात. बिनतुपाचा फराळ – अगदीं लग्नांतला देखील. अन् त्यांतहि काय असायचंय? आतां बायकांचा दिमाखच पाहून घ्या तेवढा. अंगावर दागिने पुष्कळ पण सारे नकली.



अनुक्रमणिका

नुसते शोभेचे. एखादीला लुबाडलें तर दहा रुपायाचा माल हातांत यायची पंचाईत ! "

" पण दादा, सिगारेटहि नव्हती ? "

" नाहीं, बाबा. त्यावेळचे लोक हुक्का ओढायचे. एकदां मी न् माझ्या भावानें एका लोहाराच्या ओट्या-वरून हुक्का पळवला. रातभर वाड्यांत बसून तो ओढला. दिवसां ओढायची सोयच नाहीं. अशा सात एक राती हुक्का प्यालों. मग झाली तो वांटायची तक्रार. अन् आम्ही तो मोडून टाकला. "

" दादा, आम्ही ऐकलं तुम्ही रुपये बनवीत होतां ! "

" हो " माजा वेला बोलणार तोंच त्याच्या मुलानें त्याला अडवलें, " बाबा, गप रहा हं. ती गोष्ट इथं काढूं नका. "

आणि थोडा वेळ तो चूप राहिला. गोष्टी ऐकण्यांत दंग झालेला एक पोरगा म्हणाला, " आई, मला भूक लागलीय " आणि उठून आईकडे जातां जातां बोलला, " दादा, रुपयाची गोष्ट घरीं गेल्यावर सांगाल ना ? "

" सांगेन हं बाळ, जा बघ बघूं तुझ्या आईनं काय आणलंय खायला. "

" दादा, तुम्ही किती रुपये बनवले होते ? " दुसरा एक पोरगा विचारता झाला.

" इतके ! " दोन्ही हातांत एक माठ मावेलसें अंतर करीत माजा वेला म्हणाला. आणि तशा हातांनींच त्यानें त्या पोराला वर उचललें.

" दादा, तुमच्या मिशा रुपयासारख्याच पांढऱ्या आहेत, नाहीं ? " एक पोरगा माजा वेलाच्या मिशीच्या आंकड्यांशीं खेळत म्हणाला. माजा वेला हंसला आणि मिशीवर ताव देत त्यानें उत्तर दिलें :

" नाहीं हं बाळ – त्या सुतरफेणीसारख्या आहेत; अगदीं खंबायतच्या सुतरफेणीसारख्या. "

" म्हणजे हो काय, दादा ? " मुलानें जिज्ञासेनें विचारलें.

" अरे बाप, तूं अजून सुतरफेणी नाहीं खाल्ली ? "– माजा वेलाला जीवनाबद्दल पश्चात्ताप होऊं लागला. " अरे, आम्ही जितकं खाल्लंय तितकं तुम्हाला पाह्यला देखील नाहीं मिळायचं. या अलीकडच्या माणसांना मिळतं काय खायला ? " आणि दूर बस-लेल्या टोळीकडे बघत ओरडला :

" अरे, कोणाजवळ सुतरफेणी आली असली तर इकडे आणा पाहूं. "

बायका हें ऐकून किंचित् हंसल्या. पुरुषांपैकीं कुणीतरी हळुच म्हणालें : " म्हाताऱ्याला मरतां मरतां डोहाळे सुचताहेत ! "

"अरे, ऐकलं कीं नाहीं कुणी ? " माजा वेला पुन्हा म्हणाला.

" आली म्हणजे देऊं हं दादा ! अजून तर डाळ-भातच आलाय. " कुणीतरी कोमल सुरांत उत्तर दिलें.

" बरं, बरं. मला नाहीं कांहीं खायची. पोराला दाखवायला पाहिजे होती थोडीशी. "

आणि प्रत्यक्ष सुतरफेणी येईपर्यंत तिचं वर्णन कर-ण्याचा मुलांचा आग्रह पाहून तो सांगूं लागला :

" अरे, तुम्ही गवऱ्या थापतां ना गवऱ्या ! तशी लहानशा गवरीएवढी असते बरं का. "

पोरं " छी, छी: " करूं लागलीं.

" अरे ऐका तर खरं. पण ती असते पांढरी, अगदीं दुधासारखी हं. "

" हं. " पोरांनीं आश्चर्यानें डोळे विस्फारले.

" आणि गोड गोड. आंत केशर असलं तर पिवळी असते. "

" पिवळी. खिचडीसारखी ? "

" हो. तशीच. आणि आंत वेलची, बदाम, पिस्ते, जायपत्री सगळं कांहीं असतं बरं का ! "

"म्हणजे काय, दादा ? " पोरं पुनः विचारूं लागलीं.

" अरे, तुम्ही तें सगळं पाहिलं नाहीं अजून ? " माजा वेलाला आश्चर्य वाटलें. आपल्या मुलांनीं या पोरांना अजून काहींच खायला दिलं नाहीं, दाखवलं नाहीं म्हणून त्याला मुलांचा तिरस्कार वाटूं लागला. एखाद्या वाण्याचं दुकान फोडून सारा सुकामेवा आणण्याचा विचारहि क्षणभर त्याच्या मनांत डोकावून गेला.

" कधीं तरी दाखवीन हं बेटा. जगलों वाचलों तर " तो म्हणाला.

" अहो दादा, तुमच्या मिशा पहा कशा थरथर-ताहेत. " एक पोरगा म्हणाला.

" आणि दादांचे खांदे पण कांपताहेत. " दुसऱ्यानें री ओढली .

" दादा, सुतरफेणी खाल्लीत तर लगेच हें बंद होईल. " तिसरा म्हणाला. " थांबा हं ! मी घेऊन






अनुक्रमणिका



येतों. " असें म्हणून तो उठला आणि आपल्या बापाजवळ जाऊन त्याला बिलगून सांगूं लागला : " बाबा, दादांना सुतरफेणी खायला दिली तर ! बघा ते कसे थरथर कांपताहेत ! "

तो मोठा माणूस, माजा वेलाचा मुलगा, माजा वेलाकडे वळला.

"बाबा, ताप चढला का पुनः ? मी म्हटलं नव्हतं ? "

" कांहीं नाहीं रे. जराशी थंडी वाजतेय्." माजा वेला म्हणाला. " तुम्ही तुमचं काम करा बाळ. "

पण म्हातार्‍याचा पुतण्या वना त्याच्याजवळ आला आणि त्यानें म्हातार्‍याला हात लावून पाहिलं. ताप चढूं लागला होता. आपल्या अंगावरची हिरवी कांबळ म्हातार्‍याच्या अंगावर घालीत तो म्हणाला : " घ्या ही. आतां बोलूं नका फार. " आणि मुलांना दूर पिटाळूं लागला.

माजा वेला म्हणाला " बसूं देत त्यांना माझ्या-जवळ ".

दादांच्या कांबळीच्या टोकांशीं खेळत पोरं बोलूं लागलीं : " दादा, ती रुपयांची गोष्ट अजून सांगायची आहे हं आम्हाला.", "तुम्ही बनवाल तेव्हां एकेक द्या हं आम्हाला.", " आम्हाला पाहिजे आहे.", "आणि तें खायचं सुद्धां आम्हाला बघायचंय हं, दादा. काय त्याचं नांव ? उतर . . . उतर . . ."

माजा वेला हंसूं लागला. "सुतरफेणी. खाल्ली तुम्ही ! नांव तर धड घेतां येतच नाहीं तुम्हाला."

तो टॉवरच्या भिंतीजवळ थोडासा सरकला आणि भोंवतालच्या हालचालीकडे पाहूं लागला. त्याच्या लेकी-सुना उठबस करीत होत्या. कुणी गाडग्यांतले पदार्थ काढून ठेवी व तें घेऊन पुनः वेशीकडे जाई. दूर कोठून तरी बॅंडचा आवाज येत होता. वेशीच्या आंत बत्त्यांचा झगझगीत प्रकाश दिसत होता. रोजच्या मानानें आज लोकांची विशेष गडबड होती.

माजा वेलाला " बाहेर येऊं नका " म्हणून सांगणा-र्‍या पुतण्याचा त्याच्यावर विशेष जीव होता. तो दादाजवळ आला आणि विचारूं लागला :

" दादा, खायचंय का कांहीं ? "

" अं हं. बघूं कांहीं आलं तर "

" नाहीं. तुम्ही सुतरफेणीचं बोलत होता ना ? "

" नाहीं रे . ती तर या पोरांना जराशी दाखवा-यचीय्. "

" बरं. दुसरं कांहीं पाहिजे कां ? "

आणि जवळ पडलेलं पातेलं उचलून डोक्याचं मुंडासं ठीक करीत काठी घेऊन तो निघाला. त्याला जातांना पाहून माजा वेला चरकला. पोरगा धाडसी होता आणि कुठूनहि हात घालून कांहीं घेऊन येईल यांत संशय नव्हता. पण सांपडला तर ? आतांशा बेटे पोलीसवाले बरेंच हुशार झालेत. छे छे ! आजचा दिवस त्यानं थांबणंच चांगलं ! आणि त्यानें मोठ्यांदा हांक मारली :

" वना, ए वना, मागं ये मागं. "

पण वनाला त्याचा आवाज ऐकूं आला नाहीं. वेशीं-तल्या प्रकाशांत तो जात असतांना त्याची विशाल पाठ माजा वेलाला दिसली. आणि माजा वेलाला एकदम थकवा आला. पाय पोटाशीं घेऊन तो स्वस्थ पडला.

त्याच्याजवळ दोन एक हातावर, पोरं बाजूला सर-कून येणार्‍या गाडग्यांकडे हळूहळू वळूं लागलीं. दोन वाडग्यांत गाडग्यांतले पदार्थ काढून ठेवले जात होते. आणि ते दोन्ही हातांनीं घेऊन खातां खातां एखादा अनोळखी पदार्थ आला कीं पोरं ओरडायची : " ए उतरफेणी, उतरफेणी. "

टॉवरवर दहाचे ठोके पडले. समोर वेशीवर पहारा करणारा पोलीस बाजूस गेला. त्याला गेल्याचें पाहून माजा वेलाला एकदम सगळीकडे शांत झाल्यासारखें वाटलें. तो स्वतःवर चिडला. " या शिपुरड्याची भीति वाटते म्हातार्‍या तुला ? छे, छे, अजून तर तुला दरोडा घालायची हिंमत आहे ! "—पण त्याला वनाची आठ-वण झाली. घटकाभर आधींच वेशींतून तो आंत गेला तेव्हां त्याची पाठ कशी बरं दिसली ? तो पोलीसच्या हातांत सांपडला तर ? आहे तसा हजाराला भारी. पण आज तो माझ्याजवळ राहिला तर बरं असं वाटतंय.

" ए. कांहीं उशाला घ्यायला आहे का ? " थोड्या वेळानें माजा वेलानें विचारलें.

" दादा, घ्या, या टोपल्यावर डोकं टेका. " असें म्हणत एका पेलेबरण्यावाल्या बाईनें आपलें टोपलें त्याच्या डोक्याखालीं नीट बसवून दिलें.

माजा वेला हुश्श करीत आडवा झाला. " हे दगड बेटे जरा गार लागताहेत ! कधीं नाहीं पण आजच जरा विशेष. " असें त्याला वाटलें. पण तो तसाच








शांत पडल्या पडल्या जवळ बसलेल्या निरनिराळ्या पदार्थांवर ताव मारणाऱ्या पोरांकडे पाहून मन रिझवूं लागला.

एक तरुण मुलगी डोक्यावर गाडगें घेऊन मंद गतीनें येत होती. ती वनाची मुलगी होती. माजा-वेलाची खास लाडकी होती. तिनें आल्यावर डोक्या-वरचें गाडगें खालीं ठेवलें नाहीं तोंच 'काय आणलें, खुडी ?', 'मला.', 'खुडी, मला.' ओरडत पोरं तिच्याभोंवतीं गोळा झालीं.

" थांबा जरा, खूप मजा मजा आणलीय्. जरा दम धरा." असें म्हणत गाडग्यावर हात ठेवून ती सगळ्यांना दूर करूं लागली. पोरं तशीच खरकट्या हातांनीं वाडगीं घेऊन तिच्याभोंवतीं उभी राहिलीं. एखाद्या राणीच्या ऐटींत खुडी म्हणाली :

" हें पहा. असें नीट रांगेंत बसा. सगळ्यांना थोडं थोडं मिळेल. नीट बसाल तर देईन." आणि लगेच ती आपल्या लाडक्या दादाकडे गेली.

" दादा, झोप लागली का ? खाता का थोडंसं ?"

माजा वेला किंचित् दचकला. पण खुडीला पहा-तांच त्याचे डोळे प्रेमानें भरून आले. अर्धवट उजेडांत त्या मुलीकडे पहात तो म्हणाला :

" कोण खुडी का ? काय बाळ ? काय आणलंस ?"

आणि दादांच्या कानाशीं तोंड नेत खुडी हळूंच म्हणाली :

" आइस्क्रीम."

" या दिवसांत आइस्क्रीम !"

" हो, दादा. एका कलपांत गेलें होतें. चांगलीं भरलेलीं पाकिटं मिळालींत. तसं चांगलं आहे हं, दादा. खातां का जरासं ?"

" नको, नको. मला बरं नाहीं."

" तें सारें मिटून जाईल, दादा. थोडेंसें खा. तुम्हाला माझी शप्पथ आहे."

आणि माजा वेला खुडीच्या आग्रहानें अर्धवट बसून पाकिट तोंडाला लावून आइस्क्रीम पिऊं लागला. पितां पितां भिजणाऱ्या आपल्या पांढऱ्या मिशांचे झुपके तो हातानें साफ करीत होता.

आइस्क्रीम पिणाऱ्या दादांकडे पोरांचें लक्ष गेलें आणि तीं ओरडलीं : " बघा रे बघा. दादांच्या मिशा कशा दिसताहेत." आणि खों खों हंसूं लागलीं.

आइस्क्रीम पिऊन झाल्यावर माजा वेलाला खालचे दगड अधिकच गार लागूं लागले. त्यानें विचारलें, " पोरी, कांहीं अंथरायला आहे का ग ?"

खुडी दादाजवळ आली. दादाला थरथर कांपतांना पाहून त्याच्या अंगाला हात लावीत म्हणाली: "काय हो, दादा ? किती ताप चढलाय् तुम्हाला ? चला, वाड्यांत जाऊं."

" उतरून जाईल, बेटा. तुझा बाप आतां परत येईल. मग सगळे मिळूनच जाऊं."

दुसरीं माणसें म्हाताऱ्याच्याजवळ आलीं. आणि " काका आज पुनः बरें नाहीं ?", " अंग तापलं असून कशाला बरं आलांत ?", "फणफणताय् नुसतं" असें म्हणत त्याच्याजवळ बसलीं. पुनः त्यांच्या पूर्वी-च्या गप्पा सुरूं झाल्या. येणाऱ्या अन्नाच्या वाटणीचेंहि बोलणें चाललें होतें.

खुडीनें एका पेलेवरणीवालीजवळ आलेलीं जुनीं लुगडीं जोडून आणलीं आणि दादाला अंथरून दिलीं.

माजा वेलाला बरें वाटलें. " शंभर वर्षांचें औक्ष असो तुला, बेटा ! बस, माझ्यापाशीं बस जरा." असें म्हणत तो तिच्या डोक्यावरून हात फिरवूं लागला. आणि मनांत म्हणूं लागला: " खोडियार आई ! माझी खोडीयार माऊली !".

खुडी खोडीयार देवीला वाहिलेलीं होती. अनेक नवस पुरे करून म्हाताऱ्यानं तिला वाढवलें होतें. स्वतःच्या मुलामुलींपेक्षां देखील म्हाताऱ्याचा खुडीवर विशेष जीव होता.

" बाळ, बघ ना तुझा बाप दिसतोय का कुठं ?" माजा वेलानें विचारलें. तो अधिकाधिक बेचैन होऊं लागला.

खुडी उभी राहून वेशीकडे पाहूं लागली.

सर्वांचें खाणें संपलें होतें. पोरं अजून एका बाजूला दोन-दोन तीन-तीन अशीं जमा होऊन हात मारीत होतीं. आणि गाडग्यांतून निघणाऱ्या पदार्थांचीं नांवें घेत होतीं. माजा वेला तें ऐकून मनांत हंसत होता. " काय पोरं आहेत ? भिकारडीं कुठलीं ? कांहीं आणीत नाहींत".

माणसांची ये-जा कमी होऊं लागली. भोंवतालचीं दुकानं बंद होऊं लागलीं; त्यांतले दिवे विझूं लागले. दूर अंतरावर मात्र रस्त्याच्या मधोमध एक बत्ती








जळत होती. जणु आत्तांच रात्र झाली आहे असें वाटत होतें.

माजा वेलाची नजर एकदम टॉवरकडे वळली. अबब ! केवढा उंच टॉवर बांधलाय्. थोडासा हालला आणि पडला तर ! त्याला टॉवर थरथरतोय असा भास झाला. "म्हातारपण आलं तुला, माजा वेला." म्हातारा स्वतःशीं पुटपुटला. "अरे एवढया उंचीवरून तर आम्ही उड्या मारून पळालोंय. धावत्या आगगाडींतून उड्या टाकून निसटलोंय." आणि त्याच्या डोळ्यापुढून त्याचें रोमांचकारी जीवन जाऊं लागलें. "त्या मानानं आजकालचीं ही पोरं किती भित्री आहेत ! एकादं घर फोडलें, नाहींतर कुणाचा खिसा कातरला; नाहींतर कुठं तरी पडलेली एकादी वस्तु उचलून आणली. बस्. एकटा वना आहे खरा धाडशी. माझें नांव राखील असा !"

आणि वना जवळ नाहीं याची त्याला आठवण झाली. तो एकदम म्हणाला: "वना आला नाहीं अजून."

अनेकजण उठूं लागले. उठतां उठतां म्हणाले: "येत असेलच तो. चला आपण सगळे जाऊं या आतां", "उठा, दादा, तुम्हांला घरीं पोहोंचवूं. किती कांपतंय आंग तुमचं."

"तुम्हांला जायचें असेल तर जा. मी वनाबरोबर येतों." असें म्हणत म्हातारा पडल्यापडल्या टॉवरकडे वळला.

"आले. आले. माझे बाबा आले !" खुडी ओरडली. समोरच्या वेशींतून वेगानें पण सावधपणानें, कुणाच्या नजरेंत फारसा न भरतां, वना येत होता. सगळे आतुरतेनें त्याची वाट बघूं लागले.

जवळ येतांच वनानें लुगड्यांत गुंडाळलेली एक करंडी काढली. पोरं करंडीभोंवतीं "काय आहे ?", "काय आहे ?" करीत नाचूं लागलीं.

"सगळें कांहीं आहे" किंचित् चिडल्या स्वरांत वना म्हणाला.

"उतरफेणी सुद्धां". लहान जुळ्या पोरांपैकीं एकानें म्हटलें.

"हो. हो." करीत वना हंसला. आणि करंडी उघडूं लागला.

"पांढऱ्या गोवरी" सारखी दिसणारी एक सुगंधित वस्तु त्यानें बाहेर काढली. आणि तिचे तुकडे करून सगळ्यांना वाटूं लागला.

"अरे तुम्ही दादाला कांहीं खायला दिलं कीं नाहीं ? दिलं ? आइस्क्रीम दिलं ? खुडीनं ? अरे वारे वा. आणा दादाला एक वाडगा द्या." वाडगा घेऊन त्यांत करंडीतले सगळे पदार्थ थोडे थोडे ठेवून तो म्हाताऱ्या-जवळ गेला. "दादा, थोडं चाखतां का ?"

माजा वेला उठून बसला. नेहमींच्या खाण्यांच्या पद्धतीप्रमाणें त्यानें आपले दोन्ही पाय जवळ घेतले आणि उजव्या हातांत वाडगा घेऊन डाव्या हातानें तो त्यांतील पदार्थ चांचपून पाहूं लागला.

"सगळा अंधार झालाय्. कांहीं दिसत नाहीं. काय काय आणलंस ?"

"तुम्ही ओळखाना, दादा !" वना किंचित् हंसत म्हणाला.

"अस्सं होय." माजा वेलानें उलट हंसत हंसत उत्तर दिलें. आणि प्रत्येक पदार्थाचा एक एक घास घेत तो बोलूं लागला : "ही जिलेबी आहे. अन् हा हालवा आहे. हा मेसूर. हा बुंदी लाडू ना ? अन् हें काय मगस् कीं मोहनथाळ ? आणि हे – अं – अरे सुतरफेणी देखील आणलीस वाटतं ?" आणि त्यानें वनाला जवळ बोलावून कानांत हळुच विचारलं "कुठून उचलून आणलंस रे हें ? ठीक जमलं ना सगळं ?"

"खोडियार माउली सगळं ठीक करते. दादा, तुम्ही तुमचे खा ना ?" आणि उठून करंडींतल्या वस्तू त्यानें सगळ्यांना वाटून दिल्या अन् करंडी दूर कचऱ्याच्या पेटींत टाकून आला.

गुडघे जवळ घेऊन बसलेला माजा वेला अत्यंत संतोषानें खाऊं लागला. खातां खातां नेहमीच्या संवयी-प्रमाणें तो मिशीवरून हात फिरवीत होता. सुतरफेणी खातांना त्याला खंबायतची आठवण झाली. समुद्राची भर-ती दिसूं लागली, आणि तीच तर जीवनांतील मोठ्याहून मोठी भूल होती ! खंबायतमध्यें लूटमार करून सरळ होडग्यांत बसून तो काठेवाडांत उतरला होता. आणि समुद्रांत सारखी सुतरफेणीच खाल्ली होती. शेवटीं पोरांकडे पहात माजा वेला म्हणाला :

"अरे, खाल्ली का सुतरफेणी."

"हो हो. दादा. ही काय ?" असं म्हणत दोन-चार पोरें त्याच्याजवळ आलीं आणि सुतरफेणीचा



अनुक्रमणिका






घास त्याच्या तोंडांत देत म्हणाली :

" घ्या दादा. खा. खा ना दादा ! "

" मी खूप खाल्लें बाळ. आतां तुम्ही खा. खाण्याजोगते झालांत आतां. " आणि तो एकदम ओरडला, " वना. "

त्याचा आवाज बदलून गेला होता. वना चटकन् उठून त्याच्याजवळ आला.

" काय, दादा ? "

" मला धर बघूं बेटा. मला कांहींतरी होतंय ! "

वना म्हाताऱ्याजवळ बसला.

" मला पांघरायला देरे कांहीं. " म्हातारा म्हणाला. त्याचें सारें आंग कांपत होतें.

वनानें माजा वेलाच्या अंगाभोंवतीं कांबळ व्यवस्थित गुंडाळली अन् म्हणाला : "दादा, माझ्या मांडीवर डोकें टेकून पडा जरा. "

" खुडी कुठं आहे. माझी खोडियार माउली ! "

" ही आल्यें, दादा. " असं म्हणत दूर उभी असलेली खुडी जवळ येऊन बसली.

माजा वेला म्हणाला, " ये बाळ. शंभर वर्षांचें औक्ष असो तुला ! " असें म्हणत त्यानें खुडीच्या डोक्यावर हात ठेवला. " वना, माझ्या खुडीला चांगला नवरा पहा हं. " आणि " खोडियार माऊली, खोडिमार माऊली " करीत म्हाताऱ्यानें पुतण्याच्या मांडीवर मान टाकली !

वनानें माजा वेलाच्या हातांतील बाडगा घेऊन खालीं ठेवला. म्हाताऱ्यानें जवळजवळ सगळें संपवलेंच होतें. म्हाताऱ्याच्या मिशा वनानें हात फिरवून साफ केल्या.

" काय झालं ? काय झालं ? " करीत सगळे त्याच्याभोंवतीं गोळा झाले.

" कांहीं नाहीं " वना निग्रही आवाजांत म्हणाला. " कुणी रडूं नका. खबरदार ! म्हातारा सुखी होऊन गेला आहे ".

सर्वत्र शांतता पसरली. दोघांनीं एकत्र येऊन माजा वेलाला उचलायचा प्रयत्न केला. पण शेवटीं वना म्हणाला. " छे. तसं नाहीं जमायचं " आणि शेवटीं त्यानें एकट्यानेंच म्हाताऱ्याला उचलून खांद्यावर घेतलें आणि चालूं लागला.

त्याच्याबरोबर निघालेली माजा वेलाची तीस एक जणांची संतति हळु हळु कुजबुजत चालली होती : " माजा वेलाला अगदीं चांगलं मरण आलं ! अगदीं सुखाचं मरण ! किती चांगलं मरण ! "

## महाराष्ट्र आणि भूदानसंकल्प

१८ एप्रिल १९५१ ला श्री. विनोबाजींना हैद्राबाद राज्यांत नलगोंडा जिल्ह्यांतील पोचमपल्ली या गांवीं १०० एकरांचें पहिलें दान मिळालें. ' अखिलभारतीय सर्वसेवासंघा'नें १९५२ मध्यें भरलेल्या सर्वोदय – समाजाच्या ४ थ्या संमेलनांत २ वर्षांत २५ लाख एकर जमीन भूदानयज्ञांत प्राप्त करण्याचा संकल्प जाहीर केला. सर्वसेवासंघानें सर्व भारतासाठीं केलेल्या या संकल्पापैकीं महाराष्ट्राच्या वांट्याला १ लाख एकरांचा हिस्सा आला आहे. आतांपर्यंत सर्व भारतांत एकूण ३० लक्ष एकर जमिनीचें दान झालें आहे. यांत उत्तर प्रदेश, बिहार व राजस्थान यांनीं अनुक्रमें ५, ४ व २ लाखांचा संकल्प पुरा केला असून मध्यप्रदेश व मध्यभारत यांत अनुक्रमें ६४३२६ व ५७६४९ एकर जमीन मिळाली आहे. बिहारनें आपला प्रारंभींचा ४ लाखांचा संकल्प पुरा करून वर १५ लाख एकर जमीन दानांत दिली आहे. महाराष्ट्रांत १ लाख एकर संकल्पापैकीं फक्त १०,५०० एकर दान मिळालें आहे. पण आजपर्यंतच्या महाराष्ट्राच्या इतिहासावरून महाराष्ट्र इतर कोणत्याहि प्रान्तापेक्षां मनानें कमी श्रीमंत आहे असें मानण्याला थोडाहि आधार मिळणार नाहीं. महाराष्ट्राचा नीति-धनाचा खजिना विपुल आहे अशी माझी खात्री आहे. या धनाचें दान मागणाऱ्यांना अद्याप या खजिन्याची किल्ली गवसली नाहीं, एवढेंच. सेवापुरीसंमेलनानंतर १ ऑगस्ट १९५२ ला मी माझ्या पदयात्रेला सासवड आश्रमांतून प्रारंभ केला. हैद्राबाद, तामिलनाड, केरळ, राजस्थान, विदर्भ, नागपूर, आसाम, महाकोशल, मध्यभारत, इतक्या प्रांतांची ३१ जानेवारी १९५३ अखेरपर्यंत पदयात्रा झाली. यापुढें भूदानयात्रेसाठीं जेवढी कांहीं यात्रा मी करीन, ती महाराष्ट्राच्या १ लाखाचा संकल्प सिद्ध होईपर्यंत महाराष्ट्रांतच करीन असा मी मनाशीं निश्चय केला आहे.

— श्री. शंकरराव देव ' भूदानयज्ञ ' ( ११।२।५४ वरून )








# सांचेबंद सामाजिक प्रतिमा आणि दूषित पूर्वग्रह

लेखाच्या शीर्षकावरून लेख कशाबद्दल आहे याचा नीटसा अर्थबोध होत नाहीं, कारण दूषित पूर्वग्रह ही कल्पना जरी परिचयाची असली तरी सांचेबंद सामाजिक प्रतिमा हा शब्दप्रयोग अपरिचित म्हणून समजण्यास कठीण असा आहे. सांचेबंद सामाजिक प्रतिमा ही सामाजिक मानसशास्त्रांतहि नवीन अशीच कल्पना आहे. परंतु व्यवहारांतील तिचें महत्त्व लक्षांत घेऊन ह्या कल्पनेची ओळख करून देण्याचें योजिलें आहे.

रोजच्या व्यवहारामध्यें अनेक व्यक्तींशीं आपला संबंध येतो व त्यांचीं प्रतिबिंबें आपल्या मनावर उमटत असतात. आपल्या सहवासांतील माणसांच्या स्वभावाचे ठसे आपल्या मनावर प्रत्यहीं उमटत असतात आणि अशा तऱ्हेनें दुसऱ्या व्यक्तीबद्दलचें कल्पनाचित्र आपल्या मनांत तयार होत असतें व त्याबरहुकूम त्या माणसाशीं आपलें वर्तन घडत असतें. 'आपले नवे शिक्षक कडक आहेत' अशी एकदां विद्यार्थ्यांची कल्पना झाली कीं तो तें कल्पनाचित्र पालटेपर्यंत त्याप्रमाणेंच वागेल हें ओघानेंच आलें. आपल्या मनांतील अशा तऱ्हेच्या कल्पनाचित्रांना आपण मानसिक प्रतिमा असें म्हणूं.

जशीं व्यक्तींचीं प्रतिबिंबें आपल्या मनावर उमटतात त्याचप्रमाणें आपल्या समाजांतील निरनिराळया गटांचीं तसेंच देशोदेशींच्या लोकांचीं कल्पनाचित्रें आपल्या डोळयापुढें वावरत असतात. 'पठाण' म्हटला कीं एक ठराविक सांच्याचें ठोकळेबाज चित्र मुलांपुढें उभें राहातें आणि आधींपासूनच त्याची भीति वाटूं लागते. (रवींद्रनाथ टागोरांची 'काबुलीवाला' ही मानसिक प्रतिमा ह्या ठिकाणीं उल्लेख करण्यासारखी आहे. रवींद्रनाथांनीं मात्र आपल्या प्रतिभेनें आणि सहृदयतेनें मुलांच्या मनांतील ह्या ठोकळेबाज सांचेबंद सामाजिक प्रतिमेंतील माणुसकी आणि व्यक्तित्व ओळखून तीं रंगविलीं). तेव्हां सांचेबंद सामाजिक प्रतिमा म्हणजे समाजांतील निरनिराळया गटांबद्दल, त्यांतील व्यक्तीव्यक्तीमधील प्रकृतिभेद लक्षांत न घेतां, बनविलेल्या व त्यामुळें बव्हंशीं विपरीत अशा ठरीव सांच्याच्या ठोकळेबाज कल्पना. उदाहरणच द्यावयाचें झालें तर 'चिक्कू मारवाडी' ही एक सांचेबंद सामाजिक प्रतिमा आपल्यामध्यें सर्रास प्रचलित दिसते. स्वतःच्या मनामध्यें आणि आजूबाजूला थोडेसें पाहिलें तर अशा कितीतरी चुकीच्या कल्पना आढळून येतील.

लेखाच्या मथळयांतील दुसरा शब्द पूर्वग्रह. याचा अर्थ सरळच आहे. पूर्वग्रह म्हणजे अनुभवपूर्व विधान, मत किंवा निर्णय. ऐकून घेण्याच्या आधींच निकाल सांगून टाकावयाचा. उदाहरणार्थ, एकादा गृहस्थ फाजील आळ्यतेखोर आहे असें मुळीं गृहीतच धरून चालावयाचें. व्यक्तीच्या किंवा व्यक्तिसमूहाच्या बाबतींत एकादी कल्पना धरूनच चालावयाचें. आधींपासूनच एक ग्रह करून घेऊन अथवा एकाद्या कल्पनेचा अंगीकार अगर स्वीकार करून चालावयाचें. अशा तऱ्हेनें पूर्वग्रह म्हणजे स्वीकृत कल्पना असें म्हटलें तरी चालेल.

लेखाचें शीर्षक 'प्रतिमा आणि पूर्वग्रह' असें द्वंद्वस्वरूपी असलें तरी दोन वेगळया गोष्टींचा पृथक् विचार व्हावयाचा आहे असा निष्कर्ष काढूं नये. कारण माझ्या मतें सांचेबंद सामाजिक प्रतिमा व (सामाजिक स्वरूपाचे) पूर्वग्रह हे दोन्ही वस्तुतः अभिन्न, एकमेकांवर आधारलेले व अवयव-अवयवी या संबंधानें बांधले गेलेले असे आहेत. पूर्वग्रह प्रथम केवळ मनाचा कल किंवा आवडी-निवडी या स्वरूपाचे असतात. जसजसे पूर्वग्रह दृढ होत जातात तसतसें त्यांना निश्चित मूर्त स्वरूप येऊं लागतें व तें आपण भाषेच्या द्वारें विशद करून सांगूं लागलों कीं त्या झाल्या सांचेबंद मानसिक प्रतिमा. प्रतिमा आणि पूर्वग्रह असे दोन शब्द वापरण्यांतील उद्देश एवढाच कीं पूर्वग्रह ह्या परिचित शब्दामुळें 'सांचेबंद सामाजिक प्रतिमा' हा अपरिचित शब्दप्रयोग समजण्याला जरा सोपा व्हावा. शीर्षकांतील दोन्ही गोष्टी वस्तुतः एकच आहेत असें मानून एकत्र विचार कर-










अनुक्रमणिका

ण्याचें योजिलें आहे.

अजून एका गोष्टीचा खुलासा करावयाचा आहे. लेखाच्या शीर्षकांत 'दूषित पूर्वग्रह' असें म्हटलें आहे आणि वर जीं एकदोन उदाहरणें दिलीं तींहि वाईट पूर्वग्रहांचींच. तेव्हां सामाजिक गैरसमज आणि पूर्वग्रह हे नेहमीं वाईटच असतात का, असा कोणी आक्षेपवजा प्रश्न विचारील. त्यावर उत्तर असें कीं पूर्वग्रह दोन्ही प्रकारचे संभवतात. आपण फक्त आपल्यालाच चांगले समजतों असें नाहीं तर कित्येकदां भोळेपणानें दुसऱ्यांना चांगले, प्रामाणिक वगैरे समजून चालल्यानें पश्चात्ताप करण्याची पाळीहि आपल्यावर येते. पूर्वग्रह चांगल्या प्रकारचेहि असतात आणि तेहि विकृत पूर्वग्रहांइतकेच निराधार असूं शकतात. धर्मराज दुर्योधनाला अगदीं प्रामाणिकपणें सुयोधन म्हणत असे नव्हे का ? तेव्हां प्रस्तुत विवेचन दुसऱ्यांना चांगले म्हणण्याच्या सुसंस्कृत संवयी आणि पद्धती, दुसऱ्यांच्या चांगल्या गुणांचाच निर्देश करण्याची उच्च दर्जाची सामाजिक अभिरुचि इत्यादि पूर्वग्रहांच्या चांगल्या प्रकारांना देखील लागूं आहे.

मग वाईट उदाहरणें घेऊन दूषित पूर्वग्रहांवरच भर कां देण्यांत आला ? माझ्या मतें, त्याचीं कारणें स्वाभाविक आहेत. माणसाला नेहमीं वाईटाचाच प्रश्न पडतो आणि त्याचाच विचार करण्याची पाळी निकडीनें येते. शारीरिक, मानसिक, वैयक्तिक आणि सामाजिक स्वास्थ्य आणि शांतता धरूनच मनुष्य चालतो. त्यांत विकृति अथवा बिघाड उत्पन्न झाला कीं प्रश्न, विचार आणि उपाययोजना सुरूं होते. जमातीजमातींमधील सलोख्याचे संबंध हे इष्ट मानले तर चांगल्या प्रकारचे पूर्वग्रह हे उपकारकच ठरतात व वादाचा प्रश्न फारसा उद्‌भवत नाहीं. परंतु एका गटाचे दुसऱ्या गटाबद्दल गैरसमजुतीनें वाईट ग्रह झाले असतील तर त्यांतून परस्परसंबंध बिघडत जाण्याचा संभव अधिक. मुलगा सन्मार्गावर असला म्हणजे त्याच्या वर्तनाची छाननी करण्याची वेळ येत नाहीं. परंतु तोच मुलगा वाईट मार्गानें जाऊं लागला कीं चिंता उत्पन्न होते व विचार करण्याची किंवा कुणाचा तरी सल्ला विचारण्याची गरज उत्पन्न होते. हा व्यवहार आहे. म्हणून सामाजिक व्यवहारसौकर्याच्या दृष्टीनें दूषित पूर्वग्रहांवर जरा जास्त भर दिला आहे.

## पूर्वग्रहांची सामाजिक कारणपरंपरा

पूर्वग्रहांची कारणपरंपरा आपल्या सामाजिक जीवनाशीं निगडित झालेली आहे. पूर्वग्रह हे उपजत सहज किंवा स्वाभाविक नसतात. राजवंशांतलीं मुलें देखील कनिष्ठ म्हणून समजल्या जाणाऱ्या वर्गाच्या मुलांशीं अगदीं मोकळेपणानें खेळतात. परंतु लवकरच सामाजिक वातवरणांतून चहूं बाजूंनीं त्यांना पूर्वग्रहांचे धडे दिले जातात. आईवडील, भाऊबहीण, संवगडी, शिक्षक यांच्या दृष्टींतून व चष्म्यांतून आपण जगाकडे पाहावयास शिकत असतों. विशेषतः आईवडिलांचीं मतें आणि मुलांचे सामाजिक दृष्टिकोण यांमध्यें निकटचे कार्यकारणसंबंध असतात असें आढळून आलें आहे. घर हें एकच दूषित पूर्वग्रहसंसर्गाचें साधन आहे असें नाहीं. शेजार, पेठ, शाळा, निरनिराळे संघ हीं अनेक पूर्वग्रहांचीं सांस्कृतिक माध्यमें होत.

## विरोधाचा सौम्य प्रकार !

पूर्वग्रह अगदीं सहजासहजीं, सुखासुखीं, निर्माण होत नाहींत. त्यांच्यामागें विरोधाची, विग्रहाची, संघर्षाची पार्श्वभूमि असते. दूषित पूर्वग्रह हा विरोधाचाच एक सौम्य प्रकार होय. वैयक्तिक आणि सामाजिक संघर्षांतून कलुषित सामाजिक कल्पनांची निर्मिति होत असते. स्पर्धा किंवा परस्परविरोधी हितसंबंध यामुळें एकमेकांबद्दल गढूळ मतें तयार होत असतात. मर्यादित नोकऱ्या, जमिनी, जागा, श्रीमंतांची कृपा, राजाश्रय, लोकाश्रय असा स्वार्थाचा प्रश्न आला कीं स्पर्धा, तेढ, वैमनस्य, वैरभाव उत्पन्न होतात व त्या विग्रहाच्या वातावरणांत पूर्वग्रह जोरानें वाढीस लागतात. युद्धकाळांत तर पूर्वग्रह आणि सांचेबंद सामाजिक प्रतिमा यांची बुद्धिपुरस्सर निर्मिति आणि प्रचार केला जातो. गेल्या महायुद्धांत जपानी (Jap) म्हणजे एक तिरप्या डोळ्यांचा, विरळ दातांचा आणि रक्तानें माखलेलीं नखें असलेला असा कोणी हिंस्र पशु असें चित्र रंगविण्यांत आलें होतें. थोडेसें आत्मपरीक्षण केल्यास आपल्या संकुचित सामाजिक कल्पनांच्या बुडाशीं स्वार्थप्रेरित हेवेदावे असतात हें प्रामाणिकपणें कबूल करावें लागेल. दुसऱ्या जमातीपासून आपल्या हितसंबंधांना बाध येईल कीं काय अशी चिंता, भीति आणि असुरक्षिततेची भावना उत्पन्न होते व त्यांतून निरनिराळे पूर्वग्रह व सांचेबंद मानसिक प्रतिमा निर्माण होतात. ' मद्राश्यांची जातच












तशी. वरिष्ठांचे पुढें लांगूलचालन करून जागा पटकवा-वयाच्या ' असे लोकप्रवाद ऐकूं येऊं लागतात. स्थानिक व्यापारी आणि बाहेरून आलेले सिंधी व्यापारी यांच्या-मध्यें दुकानदारीबाबत तेढ उत्पन्न झाली कीं सिंधी लोक हे भांडखोर, घाणेरडे इत्यादि शेलक्या विशेषणांनीं त्यांची संभावना होऊं लागते. ब्राह्मण, क्षत्रिय यांमध्यें होणारे कलह तसेंच पेशवाईमध्यें देशस्थ–कोकणस्थ यांमध्यें आलेलें वैमनस्य यांत प्रचलित पूर्वग्रहांचें बीज सांपडेल अशी माझी अपेक्षा आहे.

## आपपरभाव

आपण आपल्या सामाजिक जगाची नैसर्गीक विभागणी स्वकीय आणि परकीय अशा दोन प्रकारच्या गटांत करीत असतों. ह्या स्वकीय आणि परकीय गटांना विभागणाऱ्या सीमारेषेच्या अलीकडे आणि पलीकडे आपण आप-पर अशा दोन अगदीं भिन्न दृष्टींनीं पहात असतों. स्वकीयांकडे पहातांना आपुलकीची भावना, प्रेम, अभिमान व सांभाळून घेण्याची वृत्ति दिसून येते. तेंच परकीयांकडे पाहातांना सावधगिरी, काटेकोरपणा, डोळयांत तेल घालून उणें पाहाणें, उपहास इत्यादि मनोविकार जागे होतात. वास्तविक स्वार्थाला कोण जपत नाहीं ? परंतु विरोधी पक्षानें थोडीशी जागरूकता अथवा तत्परता दाखवितांच तो समाज आपमतलबी, कावेबाज, भांडखोर, संधिसाधू, अन्यायी, दुसऱ्याचा फायदा घेणारा असा ठरतो ! 'दुसऱ्या समाजाला पात्रता नसतांना सगळे फायदे आणि सुखसोयी मिळतात. वास्तविक पाहातां ते लोक म्हणजे अतिशय मागासलेले निर्बुद्ध ! एकंदरीनें कमी दर्जाचींच माणसें तीं ' असें समजून त्यांना तुच्छ लेखण्याची संवय लागते. केवळ आपपर-भावनेमुळें इतर जातीचीं माणसें अस्वच्छ, अडाणी, निर्बुद्ध, हीन अभिरुचीचीं त्यामुळें थारा देण्यास अयोग्य व सर्वथैव त्याज्य अशीं वाटूं लागतात. परकीयांच्या वागण्याच्या पद्धती आणि चालीरीती सर्वच चमत्कारिक आणि वाईट !

ज्या वेळेला इतर जातींच्या लोकांचा कळत न कळत, उघडपणें अथवा प्रच्छन्नपणें आपण अशा तऱ्हेनें निषेध करीत असतों, त्याच वेळेला सीमारेषेच्या अलीकडल्या बाजूस असलेल्या आपल्या लोकांच्या चांगुलपणाचें, कर्तृत्वाचें एक सुंदरसें जाळें विणून आपण एक नवें जग निर्माण करीत असतों. 'आपली प्रत्येक गोष्ट चांगली नि रास्त; सगळया जगाचें आणि संस्कृतीचें केंद्र आम्ही ! आम्ही तेवढे बरोबर बाकी सगळे चूक' अशी भावना निर्माण होते.

स्वकीय-परकीय गटांना भेदून जाणाऱ्या सीमारेषे-च्या अलीकडे आणि पलीकडे ' हें चित्र पहा आणि तें चित्र पहा ' असें संपूर्ण मानसिक परावर्तन दृष्टीस पडतें. अशा तऱ्हेच्या स्वकीय-परकीय सामाजिक प्रतिमांची तुलना मोठी मनोरंजक आणि उद्बोधक होते. उदाहरणार्थ, विद्यार्थ्यांच्या कांहीं स्वकीय-परकीय प्रतिमा मी निरखून पाहिल्या आणि त्यांत थोडी-शी एकवाक्यता परंतु बरेचसे भेद दृष्टोत्पत्तीस आले. आपण महाराष्ट्रीय स्वतःला मोठे शूर, मानी, त्यागी समजतों; तर इतर लोक आपल्याला नोकरीसाठीं जीव टाकणारे, संकुचित वृत्तीचे, स्वतःच्या भाषेला आणि जातीला चिकटून बसणारे असें समजतात. तसेंच गुजराथी लोक स्वतःला मोठे उदार, सहिष्णु, आदरा-तिथ्यशील असें समजतात; तर इतर लोक गुजराथी मंडळींना लक्ष्मीभारती, स्वार्थी, पिळवणूक करणारे, भित्रे रणछोडदास अशीं शेलकीं विशेषणें लावतात ! तेंच सामाजिक दृश्य पूर्वग्रहपरत्वें किती भिन्न दिसूं शकतें याचें हें उत्तम उदाहरण आहे.

प्रकटपणें – अप्रकटपणें इतर जमातींचा निषेध आपण अतिशय तीव्र शब्दांत करीत असतों. एवढा त्यांचा अपराध तरी काय असतो असें विचाराल तर पुष्कळदां ते आपल्याहून वेगळे आहेत एवढेंच सांगावें लागेल. आणि ह्या त्यांच्या वेगळेपणामुळें व्यवहाराच्या प्रत्येक बाबतींत युक्तायुक्ततेबाबत त्यांच्याकडून हरघडी आपला अपेक्षाभंग होतो. चारचौघांत बसून ढेंकर देणें एका समाजाला कसेंसेंच वाटतें तर सार्वजनिक बैठकींत नाक साफ करतांना भलामोठा आवाज करणें दुसऱ्या समाजाला अप्रशस्त वाटतें ! अशा तऱ्हेनें वरचेवर होणाऱ्या अपेक्षाभंगामुळें चिडून जाऊन एकमेकांना घाणेरडे, रानटी, अमंगळ अशीं विशेषणें लाविलीं जातात.

## पूर्वग्रह आणि व्यक्तिदोष

व्यक्तीच्या स्वभावामध्यें कांहीं दोष असे असतात कीं त्यांचा आणि पूर्वग्रहांचा निकटचा संबंध असावा असें वाटतें. थोड्याफार प्रमाणांत आपण सर्वजण पूर्व-ग्रहानें दूषित झालेले असतों. अगदीं थोर पुरुषांनासुद्धां












पूर्वग्रहप्रेरित पक्षपाती विचार असतात. पूर्वग्रहांपासून सर्वस्वीं मुक्त असा कोणीच नाहीं हें खरें. परंतु अधिक प्रमाणांत कलुषित मनानें आचारविचार करणाऱ्या माणसांत सामान्यत्वें हट्टीपणा, आग्रही हेकेखोर वृत्ति, दुरभिमान, हटवाद इत्यादि स्वभावदोष आढळून येतात. पूर्वग्रहानें कलुषित झालेल्या मनामध्यें उमदेपणा, मोकळेपणा व दुसऱ्यांशीं पटवून घेण्याची इच्छा आढळून येत नाहीं. असलीं माणसें द्वेषी, मत्सरी असून विध्वंसक वृत्ति आणि कृति यांमध्यें आपल्या शक्तीचा दुरुपयोग करतात व त्यामुळें विधायक कार्यप्रवृत्ती वाढीला लागत नाहींत. कोत्या विचारांच्या आणि क्षुद्र कल्पनांच्या कूपमंडूक जगांत कोंडून राहिल्यामुळें उघडया जगांत निरनिराळया लोकांबरोबर वागणें त्यांना जमत नाहीं.

सांचेबंद सामाजिक प्रतिमा आणि पूर्वग्रह हे व्यक्तींतील प्रकृतिभेद लक्षांत न घेतल्यानें बनत असतात. वास्तविक कोणत्याहि दोन व्यक्तींचें वर्तन आणि स्वभाव सारखे नसतात. परंतु आपण विशिष्ट गटांतील सर्वच लोकांना एकांच मालिकेंत बसवून सर्वांची एक मोट बांधून, सरसकट एक शिक्का मारून मोकळे होतों. ' सब घोडे बारा टक्के ' हा न्याय आपण लागूं करतो. न्याय कसला ! अन्यायच तो ! पूर्वग्रह म्हणजे जात्यांत भरडून, रगडून काढण्याचें यंत्र व तंत्र. गुणदोष व्यक्तीच्या ठिकाणीं असतात, जातींत नव्हे हें तत्त्व विसरून व्यक्तीचे दोषारोप सामुदायिक रीतीनें आपण सर्व समाजावर लादीत असतों. एकदोन व्यक्तींच्या बाबतींत आलेले प्रत्यक्ष अनुभव किंवा कर्णोपकर्णी आलेली माहिती आपण सरसकट सर्वांना लागूं करतों. अमुक व्यक्ति कंजूष आहे असें न म्हणतां 'भारी चिकट मंडळीं आहेत तीं ' असें सामान्य विधान आपण ठोकन देतों. ठराविक सांचेबंद कल्पना म्हणजे अशा तऱ्हेच्या संक्रमणावर आधारलेलें विधान होय असें डॉ. **गार्डनर मर्फी** यांनीं ( ' In the Minds of Men ' या आपल्या पुस्तकांत ) सांगितलेलें आहे. व्यक्ति आणि समष्टि अथवा मनुष्य व त्याचा वंश, जात यामध्यें जें निकट साहचर्य असतें त्या साहचर्यामुळें एकदोघां व्यक्तींपासून सर्व समाजाच्या बाबतींत हें संस्कारसंक्रमण शक्य आणि सुलभ होतें. कल्पनासाहचर्यासारखाच हा प्रकार आहे.

आपण सांचेबंद सामाजिक कल्पनांचा सर्रास उपयोग करतों याचें एक कारण सुचतें तें असें : एकाद्या विशिष्ट व्यक्तीबद्दल कांहीं निंदाव्यंजक विधान करावयाचें झाल्यास ती व्यक्ति आपल्याला जाब विचारील ही भीति असते. परंतु ' मुसलमान म्हणजे विश्वासघातकी' असें सामान्य विधान जबाबदारीची विशेष खंत न बाळगता करणें सोपें असतें. पूर्वग्रह म्हणजे कोणाचें नांव न घेतां केलेली विषारी टीका व प्रहार होय.

तर्कदृष्टीनें पाहिलें तर सामान्य लक्षणप्रकार सांगण्याचे किंवा व्यक्तींचें वर्गीकरण करण्याचे कांहीं नियम असतात. हे सर्व बाजूला ठेवून सांचेबंद प्रतिमा ह्या अविवेकावर, भावनादूषित विचारांवर व चुकीच्या ठोकळेबाज वर्गीकरणपद्धतीवर आधारलेल्या असतात. त्यांच्यांत तर्कशुद्धता नसते तर भावना, गैरसमजुती आणि दंतकथा यांची सरमिसळ असते. सामाजिक प्रतिमा तर्कदृष्टीनें असमर्थनीय असतात, म्हणूनच कीं काय त्यांच्यामध्यें भावनांची प्रखरता अधिक प्रमाणांत असते व त्यामुळें सामाजिक व्यवहाराच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व फार असतें. एकदां एकाद्या पारशी गृहस्थाला ' पारसुटला ' म्हटलें कीं आपल्यापुढें असलेली व्यक्ति कशी आहे हें पाहातो कोण ? त्यांच्यापासून शक्य तितक्या दूर राहावयाचें हें ठरलेलेंच असतें.

## पूर्वग्रह आणि लोकशाही

पूर्वग्रहांची कारणमीमांसा करतांना समाजव्यवस्था आणि वाढती लोकशाही यांचाहि विचार व्हावयास हवा. आपल्या जुन्या वर्णव्यवस्थेंत जातिभेद व श्रेष्ठकनिष्ठ भाव दोन्हीं बाजूंनीं मान्य केले गेलेले असत. अशा व्यवस्थेमध्यें प्रत्येक ज्ञातीला आणि त्यांतील व्यक्तींना आपापलें काम व स्थान नेमून दिलेलें असतें. प्रत्येकाला आयुष्यांत काय मिळवावयाचें व मिळावयाचें हें ठरून गेल्यासारखें असतें त्यामुळें जातीजातींमध्यें स्पर्धा, वैमनस्य कमी प्रमाणांत असतें. " पूर्वी जमातीजमातींत सलोखा अधिक प्रमाणांत असे " असें जुन्या पिढीतील मंडळींचे उद्गार आपणा सर्वांच्या परिचयाचे आहेत. परंतु अलीकडे जन्मजात वर्णव्यवस्थेवर आधारलेला समाजाचा कठीण सांचा व पोलादी चौकट मोडकळीस येत आहे व समाजाच्या निरनिराळया थरांमध्यें गतिशीलता निर्माण झाली आहे. हें योग्यच आहे. उत्तरोत्तर








समाजांतील गतिशीलता वाढत जाणार आणि ती वाढविण्याचे प्रयत्न अधिक प्रमाणांत व्हावयास हवेत. परंतु ह्या गतिशीलतेचा एक परिणाम म्हणजे सत्ता, हक्क, शिक्षण, जीवनाच्या वाढत्या गरजा यासाठीं स्पर्धा उत्पन्न झाली. त्यांतून जातीजातींमधील कलह, तंटे, बेबनाव निर्माण झाले. एकंदरीनें समाजामध्यें अस्थिरता, अनिश्चितता, असुरक्षितता, भविष्याबद्दल चिंता, भीति इत्यादि उत्पन्न होतात. आणि अशा स्पर्धेच्या आणि असुरक्षिततेच्या वातावरणांत संकुचित वृत्तीचें आणि पूर्वग्रहांचें पीक अधिकच जोरानें फोफावतें. जो तो गट आपलें स्थान टिकविण्याचा प्रयत्न करूं लागतो व संरक्षणात्मक म्हणून समजल्या जाणाऱ्या ब्राह्मणसभा, ऋग्वेदी देशस्थसंघ अशा प्रकारच्या संकुचित संघटना निर्माण होऊं लागतात. पूर्वग्रहांची परंपरा अनायासेंच चालू राहते.

स्वकीय-परकीय भेद दर्शविणें, ते पाळणें, एकमेकांचा एकमेकांना विटाळ किंवा सरमिसळ होऊं न देणें, अलिप्तता, दुजाभाव आणि जातीजातींतील अंतर कायम राखणें हें दूषित पूर्वग्रहांचें कार्य होय. ' महारडा आणि खुशाल बैठकीवर येऊन बसतो. ज्यानें त्यानें आपल्या पायरीनें राहावें ' अशा तऱ्हेचे उद्‌गार 'महारडा' ह्या सांचेबंद प्रतिमेचें समाजांतील कार्य दर्शवितात. जातीचीं आणि वर्गाचीं बंधनें आणि मर्यादा विसरून जर एकादी व्यक्ति वागूं लागली तर उच्चनीच भेदांची जाणीव करून देणें व तिला स्वस्थानीं नेऊन बसविणें हें पूर्वग्रहांचें कार्य. बोलण्यांतली भाषा हा भिन्नत्व दर्शविण्याचा व टिकविण्याचा एक महत्त्वाचा मार्ग आहे. ' खालच्या लोकांसारखे अपशब्द बोलायचे असतील तर जा त्यांच्यांतच जाऊन राहा ' असें मुलाला दटावलें कीं झालें ! समाजाचे दोन अगदीं वेगवेगळे गट पडले: एक आमच्यासारखी शुद्ध भाषा बोलणाऱ्यांचा व दुसरा त्यांच्यासारखी हेंगाडी, रांगडी भाषा बोलणाऱ्यांचा. आणि आम्ही मात्र उच्च दर्जाचे आणि संस्कृतीचे हें ओघानेंच आलें !

## सत्य कशाला म्हणावयाचें ?

" पूर्वग्रह आणि सांचेबंद सामाजिक प्रतिमा ह्या सर्वदाच विपरीत आणि असत्य असतात का ? त्यांत सत्यांश कधीं नसतोच कां ? एकाद्याच जमातीबद्दल विशिष्ट प्रवाद कां ऐकूं येतो ? उगाच आगीशिवाय धूर कसा निघेल ? " असें विचारलें जातें.

सामाजिक कल्पनांत सत्यांश कधीं नसतोच, असें म्हणणें धाष्ट्यांचें होईल. परंतु मुळांत आधार नसतांना वाटेल त्या कल्पना प्रसृत होऊं शकतात हें मात्र निश्चित. आरमेनियन लोक अतिशय उधळे असा अमेरिकेंत त्यांच्याबद्दल प्रवाद आहे. पण बचतीचे आंकडे पाहिले तेव्हां असा निष्कर्ष निघत नाहीं असें आढळून आलें. सांचेबंद सामाजिक प्रतिमांमधील सत्यांश ठरवितांना पंचाईत ही पडते कीं सत्य कशाला म्हणावयाचें ? वस्तूचे गुणधर्म काय हें ठरविण्याचें विज्ञानाचें एक तंत्र ठरलेलें आहे. समाजांतील गटांचे खरे गुणधर्म कोणते याबद्दलचे निर्णय घेण्याइतकें समाज–विज्ञान प्रगत झालेलें नाहीं. एकदोन सूचना मात्र ग्राह्याशा वाटतात. त्या म्हणजे आपल्या ज्या कल्पना व मतें तींच म्हणजे हमखास सत्य असें धरून चालूं नये. त्याचप्रमाणें सत्य जेथें इतकें अनिर्णीत आहे तेथें अप्रिय गोष्टी बोलण्याचें टाळणें इत्यादि सामाजिक सदभिरुचीचे नियम अधिक कसोशीनें पाळावे.

" मर्यादित अनुभवांवर आधारलेल्या सामाजिक कल्पना अपरिहार्य नाहींत का ? आपल्या मर्यादित जीवनांत किती व्यक्तींचा प्रत्यक्ष परिचय आपल्याला करून घेतां येईल ? ' असाहि प्रश्न उत्पन्न होऊं शकतो. व्यवहारांत फारच थोड्या माणसांशीं संबंध येतो हें खरें. आणि मर्यादित अनुभवांवरून जातीजातींबद्दल सामान्य विधानें करावीं लागतात हेंहि मान्य केलें तरी असल्या विधानांतील खोटेपणा आपण त्यांना जी अवास्तव व्याप्ति देतो त्यांतून उत्पन्न होतो ही जाणीव ठेवावयास हवी. त्याचप्रमाणें सांचेबंद प्रतिमा हटकून आणि सर्वस्वींच वस्तुस्थितीला सोडून असतात असें नाहीं हें जरी मान्य केलें तरी सामान्य लक्षण म्हणून ज्या गुणधर्माचा उल्लेख होतो त्याचा बहुंशीं वस्तुस्थितीशीं निकटचा संबंध नसतो हेंहि लक्षांत ठेवावयास हवें. बऱ्याचशा सामाजिक विचारांत उथळपणा, अतिव्याप्ति आणि अवास्तवता असे दोष असतात हें जाणून एवढेंच सुचवावयाचें आहे कीं दुसऱ्यांच्याबद्दल विचार करतांना संकुचित दोषैकवृत्ति आणि आग्रह नसावा तर उलट पक्षीं आपल्या कल्पनांच्या विकृत आणि मर्यादित स्वरूपाची सदैव जाणीव असावी.

पूर्वग्रहांची मीमांसा मनोविश्लेषणशास्त्राच्या दृष्टीनें



अनुक्रमणिका






करणें फार महत्त्वाचें आहे. परंतु त्यांत अप्रकट मनाचें परीक्षण करावें लागून अपेक्षेबाहेर विषयविस्तार होईल ह्या भीतीमुळें मनोविश्लेषणात्मक पृथक्करण प्रस्तुत लेखांत हातीं घेत नाहीं.

### पूर्वग्रह कमी कसे होतील ?

आतांपर्यंत जी काय कारणमीमांसा दिली तिचा विचार करतां असा प्रश्न उभा राहातो कीं दूषित पूर्वग्रह कमी कसे होतील व एकमेकांचीं मनें एकमेकांबद्दल शुद्ध राखण्यासाठीं काय करावयास हवें ? पूर्वग्रहांचें कांहीं नियंत्रण किंवा नियोजन शक्य आहे कां ?

मानसिक विकृतींची एक मौज अशी असते कीं ती विकृति समजून घेण्यानेंच अर्ध्यावर अधिक इलाज होत असतो. सामाजिक प्रतिमांचें आणि पूर्वग्रहांचें यथार्थ स्वरूप समजल्यानंतर त्यांचा बेदरकारपणें उपयोग करणें साहजिकपणेंच आपण टाळूं.

आपल्या समाजांत पूर्वीची जन्मजात वर्णव्यवस्था जाऊन लोकशाहीचा जो उदय होत आहे त्यामुळें किंचित् काळ जमातीजमातींतील पूर्वीचा सलोखा जाऊन वैमनस्य वाढत आहे कीं काय असा विचार वर आलेला आहे. यावर उपाययोजना म्हणून कोणी म्हणेल कीं लोकशाहीनें जर ही विकृति फोफावते तर लोकशाहीच रद्द करा ! पण हा मार्ग, ही उपाययोजना चुकीची आहे. कोणत्याहि समाजाला भूतकाळांत जाऊन इतिहासांत दडून राहतां येत नाहीं. लोकशाहीमुळें क्वचित् वैमनस्य वाढत आहे असें वाटत असेल तर त्यावर उपाय म्हणजे अधिक प्रमाणांत व अधिक चांगल्या प्रकारची लोकशाही हा होय. आपण जर खऱ्या अर्थानें लोकशाही, समता प्रस्थापित करूं शकलों तर उचनीचभेदभावांवर आधारलेले गैरसमज आपोआप कमी होऊं लागतील असा विश्वास वाटतो. खरी लोकशाही म्हणजे व्यक्तीला किंमत; जातिनामाला नव्हे. खऱ्या लोकशाहींत समता आणि समान संधि असते व सर्वांना – मग ते कोणत्याहि जमातीचे असोत – आपल्या भविष्याबद्दल विश्वास, सुरक्षितता, आशा आणि हुरूप वाटावयास हवा. सर्वांना विश्वास वाटूं लागला कीं चिंता, असुरक्षिततेची भावना यांतून जे गैरसमज निर्माण होतात ते होणार नाहींत. कार्यक्षमता व गुण यापरत्वें अधिकार आणि मान – जातिपरत्वें नव्हे – हें नुसतें तोंडानें म्हणून भागावयाचें नाहीं. लोकशाही समानता सामाजिक व्यवहारांत उतरली पाहिजे. जातिधर्मनिरपेक्ष, खुल्या दिलाची समाजव्यवस्था आल्यास पूर्वग्रह बऱ्याच प्रमाणांत कमी होतील यांत संदेह नाहीं. आर्थिक विषमता असतांना लोकशाही आणि समता टिकणें कठीण. द्रव्यार्जनाची तृष्णा, सत्तेचा अभिलाष आणि त्यासाठीं स्पर्धा ह्या ऐवजीं सहकार्य, समन्वय इत्यादि जीवनमूल्यांचा स्वीकार केला गेला तर आपापसांतले हेवेदावे बऱ्याच प्रमाणांत कमी होतील अशी आशा करण्यास जागा आहे. कोणत्याहि सामाजिक गटानें आपण जगावेगळे श्रेष्ठ, खरे आर्य, ' वास्तविक राज्य करावें आम्हीच ' असा वृथाभिमान धरूं नये. सर्वांना बरोबर घेऊन, सर्वांच्या बरोबर चालण्याची वृत्ति अंगीकारली पाहिजे.

जसें सर्वांगीण लोकशाही तसेंच शिक्षण हें समता व समजुतदारपणा प्रस्थापित करण्याचें प्रभावी साधन आहे. पूर्वग्रहांमधील भावनांचा व बुद्धीचा पोरकटपणा घालवून शिक्षणानें दृष्टीला समतोलपणा, शुद्धता, प्रगल्भता आणि विशालता आणली पाहिजे. बुद्धिवाद आणि शास्त्रीय दृष्टि यांची कास धरावयास हवी.

निव्वळ पुस्तकी ज्ञानानें एकमेकांबद्दलचे गैरसमज कमी व्हावयाचे नाहींत. समान भूमिकेवरून परस्परसंबंध, दळवळण आणि सहकार्य वाढलें पाहिजे. निरनिराळया जमाती एका ध्येयानें प्रेरित होऊन, खांद्याला खांद्या लावून जेव्हां कार्य करतील तेव्हां ' मी हिंदू व तूं अहिंदू ' अशा कोत्या भेदभावांना वावच राहाणार नाहीं. सर्वांना सुख आणि समृद्धि लाभेल अशा तऱ्हेच्या नवसमाजनिर्मितीच्या कार्याला जर आपण वाहून घेतलें तर कोत्या विचारांना फारसें स्थान राहावयाचें नाहीं असा विश्वास वाटतो.

## भारताचा शोध

माझ्या सबंध जीवनभर भारतमातेला मी सारखा शोधीत आहे. ग्रंथांतून, इतिहासांतून, प्राचीन अवशेषांतून, कलाकृतींतून, पर्वत, वाळवंटें, मैदानें यांमधून भारतमातेचा शोध माझा सारखा चालू आहे. भारतीय जनतेच्या डोळयांमध्यें भारतमातेचें दर्शन मला झालें आहे. माझ्या भारताचें हिमालयांतल्यापेक्षांहि अधिक वैभवशाली दर्शन माझ्या देशबांधवांच्या द्वारें मला घडलें आहे. माझ्या देशबांधवांची जी एकात्मता आणि विविधता तीमधून मला भारताचें दर्शन अधिक घडलें आहे. भारताचा शोध अजून चालूच आहे.

--- श्री. जवाहरलाल नेहरु [ त्रावणकोर कोचीन दौऱ्यांतील भाषणांतून ( ९ । २ । ५४ ) ]








प्रा. सौ. शरयू बाळ

# स्त्रियांचें शिक्षण आणि व्यवसाय

सुदैवानें म्हणा अगर दुर्दैवानें म्हणा अजूनहि आमच्या समाजांत स्त्रियांचें शिक्षण व व्यवसाय यांबद्दल दिसावी तेवढी आस्था व सहानुभूति दिसत नाहीं. सुमारें पाऊणशें-ऐंशी वर्षांपूर्वी स्त्रियांच्या व्यवसायांवर लिहिण्याची अगर जाहीर चर्चा करण्याची कल्पनासुद्धां हास्यास्पद ठरली असती. स्त्रियांना आज जें बौद्धिक जीवन उपलब्ध झालें आहे त्याचें सर्व श्रेय आगरकर, गोखले, न्यायमूर्ति रानडे, रमाबाई रानडे, महात्मा ज्योतिबा फुले, गुरुवर्य कर्वे वगैरे समाजसुधारकांसच द्यावें लागेल. स्त्रियांनीं शाळेंत जावें, शिकावें अशा मतांचा पुरस्कार केल्याबद्दल त्यावेळीं आमच्या समाजांतील बहुसंख्य लोकांनीं त्यांची निंदा केली व सर्वतऱ्हेनें त्यांचें जीवन असह्य करण्यासच हातभार लावला. असें असूनहि त्यांची तत्त्वप्रणाली प्रामाणिक व कालाला अनुसरून योग्य असल्यानें ती समाजांत रुजली व आज मुलाप्रमाणें मुलीलाहि शिकविलें पाहिजे, असें सर्वसामान्य माणसाचें मत झालें आहे. सुमारें ३५–४० वर्षांपूर्वी ज्या स्त्रिया शिकल्या, पदवीधर झाल्या त्यांचें समाजाकडून फार कौतुक झालें. त्यांनाहि आपण फार मोठें कांहींतरी मिळविलें असें वाटे. त्यांच्यापैकीं ज्या थोड्या बोटावर मोजण्याइतक्या स्त्रियांना शिक्षणखात्यांत अगर इतर ठिकाणीं नोकऱ्या मिळाल्या, त्यांनीं व्यवसायदृष्ट्या आपलें आयुष्य यशस्वी केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण त्यानंतरच्या पदवीधर स्त्रियांकडे पाहिलें तर बहुतेक सर्वजणी शिक्षिकेच्याच पेशांत शिरलेल्या दिसतात. शिक्षण झाल्यानंतर विवाहाची ठराविक चाकोरी न पत्करतां, अविवाहित रहावें, मानानें अर्थार्जन करावें व कांहीं समाजकार्य करावें अशा तऱ्हेच्या कल्पना त्या स्त्रियांत रूढ झाल्यानें कित्येक अविवाहित राहिल्या. पण निव्वळ अर्थार्जनाव्यतिरिक्त कोणतेंहि मोठें ध्येय त्यांचें एकाकी जीवन गांठूं शकलें नाहीं. गेल्या १५ – २० वर्षांत मात्र पालकांची मनोवृत्ति झपाट्यानें बदलत आहे. वय वाढलें म्हणजे व अधिक शिकलें म्हणजेहि मुलीच्या लग्नाच्या मार्गांतील अडचणीच वाढतात असें दिसून येतांच मॅट्रिक पास झाल्याबरोबर मुलीचें लग्न जमविण्याची खटपट सुरू करावी व लग्न होईपर्यंत तिनें उच्च शिक्षण घेत रहावें, नंतर तें पुरें व्हावें कीं नाहीं हें ठरविण्याची जबाबदारी तिच्या सासरच्या मंडळींवर सर्वस्वीं सोंपवावी असा कल दिसतो. आमच्यांत हा वैचारिक बदल कां झाला, याचीं कारणें संशोधन करण्यासारखीं आहेत. मुलींना उच्च शिक्षण दिल्यानें त्यांच्या आकांक्षा वाढतात व त्या आजच्या विशिष्ट सामाजिक जीवनांत सफल मात्र होऊं शकत नाहींत हा अनुभव येतांच पालक पुन्हा मागें जाऊं पहात आहेत. सुशिक्षित स्त्रीला मात्र वैफल्य व नैराश्य यांनीं घेरलें आहे.

## पाश्चात्त्य स्त्रियांमधील जागृति

इंग्लंड-अमेरिकेंतल्या स्त्रिया सुधारणेच्या ज्या मार्गानें गेल्या त्यांचेंच आपण अनुकरण करीत असल्यानें गेल्या पन्नास वर्षांत त्यांच्या जीवनांत कसकसे फेरफार होत गेले हें पाहणें बोधप्रद ठरेल. माता व पत्नी याखेरीज एक जबाबदार नागरिक म्हणून देशाच्या जीवनांत आपल्याला स्वतंत्र स्थान असावें अशी जाणीव अमेरिकन स्त्रियांना प्रथम इ. स. १८४८ मध्यें झाली. त्यावेळीं अमेरिकेंतील सेनेका फॉल्स् या ठिकाणीं जमून कांहीं स्त्रियांनीं आपल्या आकांक्षांचा एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्या वेळेपासून अमेरिकन स्त्रियांनीं स्वातंत्र्याची चळवळ सुरू होऊन १०० वर्षें पुरीं झाल्यावर, अमेरिकेंत हा शताब्दी-समारंभ देशव्यापी प्रमाणावर इ. स. १९४८ मध्यें साजरा करण्यांत आला. हा समारंभ तेथील 'वुमेन्स ब्युरो'तर्फे आंखण्यांत आला होता व त्यांत शंभर वर्षांत युरोपिअन् स्त्रियांनीं प्रगतीचे कोणकोणते टप्पे गांठले व त्यांचे त्यांच्या जीवनावर बरेवाईट काय परिणाम झाले याचा आढावा घेण्यांत आला. इंग्लिश स्त्रियांना मताधिकार मिळविण्यास



अनुक्रमणिका






पुरुषांशीं ७०-७५ वर्षे झगडा द्यावा लागला. पहिलें महायुद्ध सुरू झालें व युरोपखंडांतील बलाढ्य राष्ट्रांतील बरीचशीं तरुण मंडळीं युद्धाच्या आघाडीवर गेली. त्यावेळीं स्त्रियांनीं पुढें येऊन देशांतील नेहमींचे उद्योगधंदे संभाळून शिवाय स्त्रियांचें सैनिक दल, वैमानिक दल, नाविक दल, सैनिकांचें पगारखातें, गॅसप्रतिबंधक खातें वगैरे सर्व ठिकाणीं स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें काम करूं लागल्या. युद्धांत पुष्कळसे पुरुष मारले गेल्यानें युद्धानंतरहि बऱ्याचशा स्त्रिया व्यवसायांतच स्थिर झाल्या. पुष्कळांना स्वतः काम करून पोट भरण्याखेरीज गत्यंतरच उरलें नाहीं. कांहीं काल या आर्थिक स्वातंत्र्यांत स्त्रियांना धन्यता वाटलीं. व कौटुंबिक जीवनांकडे त्यांचे पूर्ण दुर्लक्ष होऊं लागलें. स्त्रियांच्या या अनैसर्गिक व अयोग्य मनोवृत्तीबद्दल हॅवलॉक एलिसनें एकें ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं " Women have come to interpret emancipation as emancipation from womanliness itself." पण अशा बेजबाबदारीचा कांहीं काल गेल्यानंतर स्त्रियांना आपल्या वैवाहिक जीवनाची व मातृत्वाची जाणीव झाली. आजची इंग्लिश अगर अमेरिकन् स्त्री विवाह, गृहकृत्य व मातृत्व यांचें योग्य महत्त्व जाणते. वैवाहिक जीवनाव्यतिरिक्त पाश्चात्त्य स्त्रिया आज कोणकोणते व्यवसाय करतात हें पाहिल्यास प्रामुख्यानें पुढील व्यवसायांचा उल्लेख करावा लागेल : नर्सिंग, डॉक्टर, दाया, शिशुसंगोपन, मजूरकल्याणकेंद्र, दुकानांतून विक्री, कारकून, उपाहारगृहांतून सेविका, विमानें व बोटी यांमधून परिचारिका, पोलीसअधिकारी, टेलिफोन व टेलिग्राफ् ऑपरेटर, ट्रॅम व बस कंडक्टर, नटी, वैज्ञानिक प्रयोगशालांतून मदतनीस, भूषा व प्रसाधन गायन–वादन–नर्तन, ग्रंथालयांत काम, शिंपीकाम, कॅनिंगच्या कारखान्यांतून कामें वगैरे.

### स्त्रियांना करतां येण्यासारखे व्यवसाय

यापैकीं आपल्या स्त्रियांना कोणकोणते व्यवसाय करतां येण्याजोगे आहेत असा प्रश्न लगेच डोळ्यासमोर उभा राहतो. रसायनें, कापड, खेळणीं, खाद्यपदार्थ वगैरे जिनसांच्या कारखान्यांत तिकडे बऱ्याच स्त्रिया काम करतात. पण हीं कामें आपण करूं शकणार नाहीं. कारण या उद्योगधंद्यांचा व कारखान्यांचा आपल्या देशांत अजून विकासच झालेला नाहीं. दुसऱ्या महायुद्धानंतर आपल्याकडील स्त्रिया मुख्यतः कारकुनी पेशांत शिरल्या व टाइपिस्ट व स्टेनोग्राफर या व्यवसायांत ज्या स्त्रिया आहेत त्यांत खिश्चन व अँग्लोइंडिअन् स्त्रियांचेंच प्रमाण फार मोठें आहे. या क्षेत्रांत हिंदु मुलींनींहि चांगलें नैपुण्य दाखविल्यास आणखी वाव मिळण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें वैयक्तिक चिटणीस यासारखीं कामेंहि स्त्रियांना करतां येण्यासारखीं आहेत. पाश्चात्त्य देशांत सेक्रेटरीचें काम शिकविण्यासाठीं मोठमोठ्या फर्म्स्कडून वर्ग चालविले जातात. अशा तऱ्हेची व्यवस्था आपल्याकडे अजून जवळजवळ नाहींच. कारकून व सेक्रेटरी म्हणून काम करण्यास इतके तरूण तयार असतात कीं त्यांमध्यें फार स्त्रियांची सोय लागणें शक्य नाहीं कारकून व सेक्रेटरी या व्यवसायांप्रमाणेंच ट्रॅम व बस कंडक्टर्स् व टेलिफोन व टेलिग्राफ् ऑपरेटर्स् या व्यवसायांची परिस्थिति आहे. आपल्या देशांत मोठे उद्योगधंदे व कारखाने यांचीं वाण असल्यानें व त्या मानानें देशाची लोकसंख्या फार मोठी असल्यानें पुरुषवर्गावरच जेथें बेकारीचा प्रसंग ओढवलेला आहे तेथें स्त्रियांनीं आणखी त्यांच्याशीं चढाओढीस उभे राहण्यांत कांहींच अर्थ दिसत नाहीं. दुसरी गोष्ट म्हणजे सैनिकदलांत जाण्याची अजूनहि आमच्या तरुणांत फारशी अभिरुचि दिसत नाहीं. बहुतेक शिक्षित तरुण सुरक्षित नागरी जीवनाकडेच ओढा दाखवीत असल्यानें आजचें व्यावसायिक जीवन अधिकच खडतर झालें आहे. मी विनंति केल्यावरून एप्लॅायमेंट एक्सचेंजचे संचालक श्री. अडवानी यांनीं स्त्रियांच्या नोकरीसंबंधींच्या परिस्थितीचे एप्रील १९५३ ते सेप्टेंबर १९५३ अखेर सहा महिन्यांचे आकडे मला दिले. एप्रिल १९५३ ते सेप्टेंबर १९५३ या सहा महिन्यांत ११८० स्त्रियांनीं नांवें नोंदविलीं. त्यांपैकीं ३६९ मॅट्रिक होत्या व ३८ ग्रॅज्युएट होत्या. या नोंदविलेल्यांपैकीं १६ मॅट्रिक, २ ग्रॅज्युएट व १९ इतर एवढ्या ३७ स्त्रियांनांच फक्त नोकरी मिळाली. यावरून आजच्या शिक्षित स्त्रियांच्या बेकारीचीहि आपणांस चांगली कल्पना यईल.

ग्रंथपालन हाहि एक व्यवसाय स्त्रियांना करतां येण्यासारखा आहे. मुंबई, दिल्ली व मद्रास विद्यापीठांतून ग्रंथपालनाच्या शिक्षणाची सोयहि केलेली आहे. पण

हें शिक्षण घेतलेले तरुणच आज नोकरीसाठीं वणवण करीत आहेत. कारण आपल्या देशांत मोठ्या ग्रंथालयांची संख्याहि बोटावर मोजण्याजोगी आहे व त्यामुळें याहि व्यवसायांतील आजची स्थिति स्त्रियांच्या दृष्टीनें फारशी आशादायक नाहीं.

डॉक्टर्स, मिडवाइव्ह्‌ज् व परिचारिका या व्यवसायांचा विचार करतांना असें दिसून येतें कीं आज बऱ्याच स्त्रिया प्रसूतिशास्त्रज्ञ आहेत व वैद्यक हा व्यवसायहि पुष्कळजणी करीत आहेत. पण यांतहि मुंबईच्या डॉ. जिराड किंवा पुण्याच्या रँकिन् अशा तुरळक स्त्रिया वगळल्यास शस्त्रक्रिया करणाऱ्या स्त्रिया दिसत नाहींत. स्त्रियांच्या रोगाबाबतहि अधिक महत्त्वाचा सल्ला हवा असल्यास पुरुष डॉक्टरकडेच धांव घ्यावी लागते. एकच विद्या शिकल्यानंतर सखोल वाचन करून व अद्ययावत् संशोधनाची माहिती मिळवून स्त्रिया अधिकारवाणीनें सल्ला का देऊं शकत नाहींत याचें उत्तर देतां येत नाहीं. असें असलें तरी प्रसूतितज्ज्ञ म्हणून आज पुष्कळ स्त्रिया डॉक्टर्स व मिडवाईव्ह्‌ज् म्हणून यशस्वी रीतीनें काम करीत आहेत ही अभिनंदनीय गोष्ट आहे. वैद्यकाप्रमाणेंच स्त्रियांना करतां येण्याजोगा एक अतिशय उपयुक्त व्यवसाय म्हणजे रुग्णपरिचारिकेचा. जिला दुर्दैवानें वैधव्य प्राप्त झालें आहे किंवा जिला जवळचे कोणीहि नातेवाईक पोसूं शकत नाहींत अशा असहाय स्त्रीनें पत्करण्याचा एकुलता एक व्यवसाय म्हणजे नर्सिंग् अशी समजूत आमच्याकडे बरींच वर्षें रूढ होती. ती आतां थोडीफार बदलत आहे. पण अजूनहि सरकारी व निमसरकारी संस्थांतर्फे चालविल्या जाणाऱ्या नर्सिंग कोर्ससाठीं विद्यार्थिनींना शिष्यवृत्त्यांचें विलोभन दाखवावें लागतें. यापुढें मुलींनीं फार मोठ्या प्रमाणांत परिचारिकेच्या व्यवसायांत पडलें पाहिजे. अर्थार्जनासाठीं तर ह्या व्यवसायाचा उपयोग होतोच. पण पैशांची जरूर नसेल तर समाजसेवा, परोपकार हेंहि ध्येय या व्यवसायाच्या मदतीनें साध्य होऊं शकतें. परिचारिका हा एकच व्यवसाय असा आहे कीं त्याची सामाजिक गरज कधीं संपणार नाहीं व कितीहि स्त्रिया हा उद्योग करण्यास पुढें आल्या तरी त्यांना बेकारीची भीति नाहीं. विवाह झाल्यानंतर खेडोपाडीं राहण्याचा प्रसंग आल्यासहि या शिक्षणाचा चांगला उपयोग होईल.

वैद्यकीय मदतनीस ( Medical Assistants ) हा व्यवसाय अजून आपल्याकडे फारशा मुली करीत नाहींत. प्रत्येक डॉक्टरला साहाय्य करण्यासाठीं म्हणून एकतरी मदतनीस लागतोच. या कामाला शिक्षण फारसें लागत नाहीं. फक्त अनुभवाचाच प्रश्न असतो. तो प्रत्यक्ष काम करण्यानेंच मिळतो. शिकवून तयार केल्यास मुली फार काळ नोकरींत टिकत नाहींत म्हणून कोणत्याहि व्यवसायांतील कौशल्य स्त्रियांना शिकविण्यास पुरुष कबूलच होत नाहींत. याला एक तोड आहे. ज्यांना वैद्यकीय व्यवसायांतीलच जोडीदार मिळेल त्यांनीं इतर व्यवसाय करण्यापेक्षां पतीलाच त्याच्या दवाखान्याच्या कामांत मदत करावी. यांत स्त्रीला काम केल्याचें समाधानहि मिळेल व पांच-पन्नास रुपये मिळविल्याचें श्रेयहि पदरांत पडेल.

स्त्रियांना करतां येण्याजोगा आणखी एक व्यवसाय म्हणजे विक्रेत्या म्हणून काम करणें. थोड्या शिक्षणानें जमणारा हा व्यवसाय आहे. किंबहुना उच्च शिक्षण घेतलेल्या मुलींनाहि हा करण्यास कमीपणा वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. पण या क्षेत्रांत आज पुरुषांचीच फार गर्दी असल्यानें स्त्रियांना फारसा वाव मिळण्यासारखा नाहीं.

शिवण हा व्यवसाय घरीं बसून करतां येण्याजोगा आहे. या व्यवसायाची सध्यां तरी परिस्थिति मोठी चमत्कारिक आहे. शिवणाचा १-२ वर्षांचा अभ्यासक्रम पास झालेल्या स्त्रिया बऱ्याच दिसतात. पण कपड्याचें ' फिटिंग ' उत्तम व्हावयास पाहिजे असेल तर आम्ही पुरुषशिंप्याकडेच देतों. असें कां व्हावें ? याबाबत माझी अशी समजूत आहे कीं शिकल्यानंतर त्यांत सफाई येण्यासाठीं जे श्रम घ्यावे लागतात ते स्त्रिया घेत नाहींत व म्हणून या धंद्यांत त्या पुरुषांच्या मागें पडतात. शिवणाप्रमाणें आज आमच्या पेहेरावांत भरतकामालाहि फार महत्त्व आलें आहे. मशीनवर व हातांनीं उत्तम भरतकाम करणाऱ्या मुलींनीं घरोघर हिंडून योग्य दरांत जर हें करून दिलें तर त्यांना बरेंच यश मिळेल असें वाटतें.

पाककला म्हणजे तर स्त्रियांचा परंपरागत खास व्यवसाय ! हरतऱ्हेचे कलापूर्ण पदार्थ स्त्रिया करतातहि. पण मोठ्या प्रमाणांवर जिन्नस करावयाचे झाल्यास पुरुष आचारीच लागतो. स्त्री प्रकृतीनें नाजुक असते.



अनुक्रमणिका






तिला येवढे श्रम झेंपत नाहींत असें म्हणणें सयुक्तिक वाटत नाहीं. पंधरा-वीस माणसांच्या कुटुंबांत रात्रंदिवस राबणाऱ्या स्त्रिया प्रकृतीनें नाजुक असतात असें कसें म्हणावें ? कांहींहि असलें तरी व्यवसाय म्हणून स्वयंपाक करणाऱ्या स्त्रियांनीं हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे.

पाककलेबरोबरच येणारा आणखी एक व्यवसाय म्हणजे हॉटेल्स्मधून 'वेट्रेसेस्' म्हणून काम करणें हा. ही कल्पना आपल्या सदभिरुचीला फारशी पटणार नाहीं कदाचित्. पण स्वतःच्या जबाबदारीवर हॉटेल्स काढून ती चालविण्याचा उपक्रम स्त्रियांनीं जरूर करून पाहण्यासारखा आहे. स्त्रियांनीं जर अशा ठिकाणीं स्वच्छ, उत्तम व घरगुती जिनसांचा पुरवठा केला तर असें खाद्य-पेय-गृह चांगलें चालेल असें वाटतें. अर्थात् अशा कामांत बऱ्याच स्त्रियांचें सहकार्य हवें.

व्यवसाय म्हणून कांहीं कलांचाहि निर्देश करतां येईल. संगीत ही एक कला अशी आहे कीं तेथें आज स्त्रियांना पुष्कळ वाव आहे. याबाबत एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं मुलीला आवड असेल व चांगल्या आवाजाची देणगी लाभली असेल तर मुलीच्या संगीत-शिक्षणास लहानपणापासूनच सुरुवात झाली पाहिजे. "गाणं शिकलं म्हणून काय झालं ? शाळा-कॉलेजचं शिक्षण हवंच !" अशी आजहि पालकांची वृत्ति दिसते व आजच्या कांहीं तरुण नामवंत गायिका युनिव्हर्सिटीच्या पदवीसाठीं उगीचच जिवाचें रान करतांना दिसतात. पण खरें पाहिल्यास इतर शालेय विषय शिकविण्यांत वेळ व शक्ति वांया घालविण्यापेक्षां एकाच कलेवर ती केन्द्रित केल्यास नैपुण्यहि अधिक संपादन करतां येईल व वेळहि वांचेल. श्री. ना. दा. ठा. वुमेन्स् युनिव्हर्सिटीमधून ऐच्छिक संगीत घेऊन पास होऊन गेलेल्या कांहीं विद्यार्थिनींनीं आज गायिका म्हणून तर कीर्ति मिळविली आहेच. शिवाय संगीताचे वर्ग काढून, संसार संभाळून त्या अर्थार्जनहि करीत आहेत.

चित्रकलेबाबतहि असेंच म्हणतां येईल. ज्यांना या कलेची उपजत अभिरुचि आहे त्यांनीं लहानपणापासूनच अभ्यासास सुरवात करून वयाच्या वीस वर्षापर्यंत या कलेच्या सर्व परीक्षा पुऱ्या कराव्यात. ज्यांना आर्थिकदृष्ट्या शक्यता असेल त्यांनीं कमर्शिअल् आर्ट सारखे कोर्सेस् घेतल्यास त्यांना निरनिराळ्या धंद्यांच्या जाहिरात-खात्यांत चांगलें काम मिळूं शकतें.

अभिनयकलेचाहि या ठिकाणीं थोडाफार विचार केला पाहिजे. गेल्या १० वर्षांत चांगल्या घराण्यांतल्या बऱ्याच मुलींनीं चित्रपट व रंगभूमि या क्षेत्रांत पदार्पण करून, कांहींनी उत्तम अभिनेत्री म्हणून नांवहि मिळविलें आहे. पण चित्रपटांत अगर रंगभूमीवर काम करणाऱ्यांचा नैतिक अधःपात होतो व त्यांच्या जीवनाला हीन वळण लागतें असा प्रवाद आजहि आमच्या समाजांत रूढ आहे. अर्थात् हें निरीक्षण या व्यवसायांतील कांहींच्या जीवनसरणीवरच आधारलेलें असतें हें खरें. कला व नीति यांचा वाद घालण्याचें हें स्थळ नव्हे. पण कै. वा. म. जोशी यांनीं म्हटल्याप्रमाणें कलेच्या तारेचा सूर जर नीतीच्या तारेच्या सुराशीं जुळला नाहीं तर जीवनाची सतार बदसूर वाजूं लागेल. चित्रपट अगर रंगभूमीचें वातावरण सदभिरुचीच्या माणसास पटेल असें कधीं होईल कीं नाहीं याबद्दल मलाच शंका असल्यानें जीवनव्यवसाय म्हणून या क्षेत्रांत स्त्रियांनीं जावेंच असें मी आग्रहानें म्हणणार नाहीं. अर्थात् तितकीच हौस असलेल्या एखाद्या मुलीनें चित्रपट अगर रंगभूमि हाच जीवनाचा मुख्य व्यवसाय म्हणून निवडल्यास आज समाजच काय पण पालकहि फारसा अडथळा करूं शकत नाहींत. स्वतःच्या कर्तृत्वानें व्यवसायाची पातळी वाढवावयाची कीं व्यवसायाच्या रूढ कल्पनांना बळी पडून स्वतःची पातळी कमी करून घ्यावयाची हें जिचें तिनेंच ठरवावें लागतें.

नृत्यकलेचाहि एक व्यवसाय म्हणून या ठिकाणीं उल्लेख करतां येईल. फक्त एक उच्च अभिरुचीची कला या दृष्टीनें नृत्याचा अभ्यास करून जीवनांतील इतर कोणत्याहि गोष्टीची पर्वा न करतां, या कलेला वाहून घेऊन स्वतःचा व नृत्यकलेचा दर्जा सर्वमान्य करणाऱ्या रोहिणी भाटे यांच्यासारख्या स्त्रिया पाहिल्या म्हणजे उत्तम शरीरसौष्ठव व आर्थिक शक्यता असणाऱ्या मुलींनीं लहानपणापासून सुरुवात करून एक तप जर या कलेच्या सेवेंत घालविलें तर मनोरंजन व अर्थार्जन हे दोन्हीहि हेतू त्या साध्य करूं शकतील असें वाटतें.

लेखन या कलेचाहि व्यवसाय म्हणून उल्लेख करतां येईल. कांहीं मुली हायस्कूलमध्यें असल्यापासूनच चांगलें लिहूं शकतात. अशा बाललेखिकांना मार्गदर्शन



अनुक्रमणिका





व प्रोत्साहन देणारीं 'सकाळ'सारखीं वर्तमानपत्रें व 'आनंद', 'चांदोबा' व 'बालमित्र' यांसारखीं मासिकेंहि आहेत. योग्य मार्गदर्शन केल्यास यांतूनच उद्याच्या नामवंत लेखिका तयार होतील. आज आपल्या देशांत लहान मुलांना वाचण्याजोगें बालवाङ्मय फार थोडें आहे. असें लेखन हा शिक्षित स्त्रियांना करतां येण्याजोगा एक चांगला व्यवसाय आहे. वर्तमानपत्रीय लिखाण व बातमीदाराचें काम ही एक शाखा स्त्रियांना काम करतां येण्याजोगी आहे. ज्यांची निरीक्षणशक्ति दांडगी आहे, राजकीय घडामोडींच्या वाचनाची ज्यांना हौस आहे त्यांनीं वर्तमानपत्रीय व्यवसायांत शिरल्यास त्यांच्या बुद्धिमत्तेस योग्य क्षेत्र मिळेल. हिंदुस्तान सरकारच्या परराष्ट्रीय खात्यांतील एक अधिकारी, परकीय देशांशीं संबंध ठेवणारे गृहस्थ एकदा मजजवळ असें म्हणाले कीं वर्तमानपत्रीय व्यवसायांत कांहीं वर्षें काम केलेल्या स्त्रिया मिळाल्यास परदेशांत 'इन्फर्मेशन ऑफिसर' म्हणून त्या चांगलें काम करूं शकतील. पण अशा स्त्रिया मिळतच नाहींत. ज्यांना बौद्धिक व आर्थिक शक्यता असेल त्यांनीं प्रयत्न करण्यासारखा हा व्यवसाय आहे.

वर्तमानपत्रीय व्यवसाय सोडला तर वकील, एंजिनिअर्स्, शेतकीतज्ज्ञ म्हणून काम करण्यास फारशा स्त्रिया पुढें येतच नाहींत. या व्यवसायांना जरूर असणारी मनोवृत्ति व शारीरिक बळ या दोहोंचीहि फारशी अनुकूलता नसल्यानें स्त्रिया या बाजूला जात नाहींत असें दिसतें. इ. स. १९३८ ते १९५३ या कालांत पुण्याच्या लॉ कॉलेजमध्यें एकूण ६१ विद्यार्थिनींनीं शिक्षण घेतलें. त्यांपैकीं आज वकिलीच्या व्यवसायांत पडलेल्यांची संख्या सहा सुद्धां नाहीं. ज्या शिक्षणाचा स्त्री पुढील आयुष्यांत कांहींसुद्धां उपयोग करूं शकत नाहीं तें शिक्षण वेळ व पैसा खर्च करून घेणें म्हणजे सामाजिक नुकसानच होय.

संशोधनासारख्या क्षेत्रांत आजहि कांहीं स्त्रिया काम करीत आहेत. पण अशा स्त्रियांची संख्या नेहमीच फार थोडी असणार. पाश्चात्त्य देशांतहि अशीच आहे. सी. एम्. थॉम्सन यांनीं "Women's Status – Yesterday, Today and Tomorrow" या आपल्या लेखांत [Women's Bureau Bulletin No. 224 ( 1948 ) ] असें म्हटलें आहे कीं, "विद्वत्तेच्या, संशोधनाच्या क्षेत्रांत पहिल्या प्रतीची कामगिरी करून दाखविणाऱ्या स्त्रिया अत्यंत विरळाच आहेत."

विमान व आगबोटींच्या खात्यांत प्रवाश्यांच्या सुखसोयी पाहण्यासाठीं विमानांतून व जहाजांतून ज्या परिचारिका नेमल्या जातात त्यांतील बऱ्याचशा ख्रिश्चन व अँग्लो-इंडियन मुलीच असून त्या या खात्यांत काम करतात. हिंदु संस्कृतीच्या मुलींना हें काम मानवणार नाहीं. कारण निरनिराळ्या शेंकडों प्रवाश्यांशीं रात्रंदिवस संबंध ठेवतांना पुष्कळ वेळां अनिष्ट प्रसंग येतात व त्यांना तोंड देण्याइतकी बेडर वृत्ति आमच्या मुलींच्या अंगांत नसते. अशीं कामें करतांना धर्म, नीति वगैरेंबद्दलच्या कल्पनांना बरीच मुरड घालावी लागते. पण वाटेल तें करून अर्थार्जन केलेंच पाहिजे व तेंहि थोड्या शिक्षणाच्या आधारें, अशी ज्यांची परिस्थिति असेल अशा धाडसी मुलींना हा व्यवसाय आवडेल.

व्यवसाय या दृष्टीनें पोलीसदलहि विचारांत घ्यावें लागेल. पाश्चात्त्य देशांप्रमाणें आपल्याकडेहि पोलीसदलांत स्त्रियांना घेण्याची प्रथा आतां सुरूं झालेली आहे. इंग्लंडच्या एकूण ६२००० पोलीस-दलापैकीं १५३८ स्त्रिया आहेत. यांपैकीं बहुतेक कॉन्स्टेबल्स् व हेड-कॉन्स्टेबल्स् या हुद्द्यावर काम करतात. स्त्री-पोलिसांचा उपयोग गुन्हेगार स्त्रिया व मुलें यांच्यासाठींच प्रामुख्यानें केला जातो. स्त्री व पुरुष पोलिसांच्या पगारांत शें. १२ इतका फरक असतो. रहदारी-नियंत्रणासारखीं कामें स्त्रियांना फारशीं देत नाहींत. पोलीसदलांत जाणाऱ्या शिक्षित मुली फारशा निघणार नाहींत. विशिष्ट धाडसी मनोवृत्ति व असामान्य शरीरप्रकृतीची देणगी असणाऱ्या मुलीच पोलीसदलांत निवडल्या जाणार. अर्थात् विवाहित व लेकुरवाळ्या स्त्रियांना या व्यवसायाचा कांहीं उपयोग होईलसें वाटत नाहीं.

स्त्रियांना, विशेषतः सुखवस्तू स्त्रियांना समाजकार्य हा एक अत्यंत उपयुक्त व्यवसाय होऊं शकेल. पाश्चात्त्य देशांत शिशुसंगोपनसंस्था, 'मॉरल वेल्फेअर', 'फॅमिली-केअर'चें काम, युवकसंस्था यांमधून बहुतेक स्त्रियाच काम करतात. लहान मुलांना वैद्यकीय मदत देणें, त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करणें, कुमार्गाला लागलेल्या मुलांना सुधार-शाळांत दाखल करून घेणें, मानसिक दोष






अनुक्रमणिका





असलेल्या मुलांना मनोविश्लेषणशास्त्रज्ञांकडून तपासून घेऊन त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करणें, सांधिक करमणुकीचीं केन्द्रें व ग्रंथालयें स्थापन करणें – अशा तऱ्हेचीं कामें या संस्थांतर्फे होतात. पदवीसाठीं ज्यांनीं मानसशास्त्र हा विषय घेतला असेल त्यांना तर या संघटनांत फार चांगलें काम करतां येईल. पण पुष्कळ विद्यार्थिनींच्या बाबतींत पदवीसाठीं निवडलेल्या ऐच्छिक विषयास परीक्षा पास होण्यापलीकडे कांहींच अर्थ नसतो व त्यामुळेंच मुलींचें शिक्षण म्हणजे सामाजिक नुकसान आहे असें म्हटलें जातें. आमच्या देशांत फावला वेळ घालविण्यांसाठीं स्त्रिया पुष्कळ मंडळें काढतात. अशा मंडळांकडून साक्षरताप्रसार व मुलांचीं शिक्षणकेन्द्रें चालविलीं गेलीं पाहिजेत.

### बालशिक्षण

बालशिक्षणांत स्त्रियांचें स्थान फार मोठें आहे. इंग्लंडमध्यें पूर्वप्राथमिक व प्राथमिक शाळांत सर्व स्त्रियाच काम करतात. दुय्यम शिक्षणांतहि पुरुषांपेक्षां स्त्रियांची संख्या जास्त आहे. स्त्रियांचा प्रेमळ स्वभाव व योग्य त्या सूचना देण्याची त्यांची हातोटी या गुणांमुळें त्या मुलांवर पहिले संस्कार फार चांगल्या तऱ्हेनें करूं शकतात. आपल्याकडे कांहीं वर्षांपूर्वी मादाम मॉंटेसोरी या बाई स्वतः आल्या होत्या व मोठमोठ्या शहरीं शेंकडों स्त्रियांचे वर्ग चालवून त्यांनीं आपली शिक्षणपद्धति आमच्या स्त्रियांना शिकविली. पण त्यावेळीं जितका पैसा बाईंनीं आमच्या देशांतून नेला त्या मानानें हा कोर्स पास झालेल्या स्त्रिया मिळालेल्या शिक्षणाचा उपयोग करीत असल्याचें दिसत नाहीं. आमच्या देशांतील गरीब व मध्यम स्थितींतील शेंकडों बालकें आजच्या बालकमंदिरांत जाऊं शकत नाहींत. अशांना शिक्षण देण्याचें सर्वस्वीं मॉंटेसोरी-शिक्षण घेतलेल्यांचेंच कर्तव्य आहे. उत्तम हवेशीर जागा, भरपूर साहित्य व पुष्कळ फी घेऊन अशा शाळा काढण्याची शक्यता नाहीं म्हणून स्वस्थ न बसतां आपल्या दोन खोल्यांच्या घरांपैकींच एक खोली दुपारचे २–३ तास वापरून ५–१० मुलांना थोडेफार शिकवितां येईल. कागद, माती वगैरे साहित्य वापरून चित्रें व खेळणीं तयार करतां येतात. थोडी कल्पकता अंगीं असेल तर प्रतिकूल परिस्थितींतहि बालकांच्या शिक्षणाचें कार्य पार पाडतां येईल. ज्यांना अन्नवस्त्रहि पुरेसें मिळूं शकत नाहीं अशा मुलांना शिकविण्यास आवश्यक ते फेरफार जर आमच्या शिक्षणपद्धतींत होऊं शकले नाहींत, तर मॉंटेसोरी-शिक्षणपद्धति आमच्या देशांत अयशस्वी होईल. शिक्षणपद्धतींतील आधुनिक तत्त्वांबद्दल योग्य तो आदर व्यक्त करूनहि असें म्हणावेसें वाटतें कीं फक्त नवीन नवीन तत्त्वांचें अध्ययन व अनुकरण माणसांच्या कर्तृत्वांत फारशी भर घालूं शकत नाहीं. परिस्थिति व व्यवहार यांची तत्त्वाशीं योग्य सांगड घालण्याचें चातुर्य जर अंगीं नसेल तर कोणताहि व्यवसाय यशस्वी होऊं शकणार नाहीं.

### वैवाहिक जीवन आणि व्यवसाय यांची सांगड

यानंतर सर्वसामान्य स्त्रीवर निसर्गनियमानेंच येणारा व्यवसाय म्हणजे वैवाहिक जीवन व मातृत्व हा होय. एकाद्या मादाम क्यूरींकडे, पंडिता रमाबाईंकडे किंवा विजयालक्ष्मींकडे बोट दाखवून सर्वसामान्य स्त्री आपल्या जीवनाचा मार्ग ठरवूं शकत नाहीं. विवाह व संसार ही ठराविक चाकोरी झुगारून देऊन एकादा निराळाच व्यवसाय निवडून आपलें जीवन सर्वस्वीं त्याला वाहून घेणारे कांहीं पुरुष व कांहीं स्त्रिया समाजांत नेहमी असतातच. पण त्यांचें प्रमाण नेहमींच अत्यल्प असतें. त्यांना त्यांच्या ध्येयाचा ध्रुवतारा फार लवकर स्पष्ट दिसूं लागतो व त्याच्या वेडांत सामान्य जीवनप्रवृत्ती कोठल्या कोठें दडून जातात. पण आजहि आमच्याच नव्हे तर सर्व देशांच्या समाजांत बहुसंख्य स्त्रिया वैवाहिक जीवनच आनंदानें स्वीकारतात. संसार व मातृत्व हा मुख्य जीवनव्यवसाय म्हणून पत्करल्यानंतर त्याकडे पाहण्याची आमची दृष्टि थोडी बदलावयास हवी असें मला वाटतें. वैवाहिक जीवनाचीं कर्तव्यें व आवडीनें निवडलेला दुसरा एकादा बौद्धिक व्यवसाय यांची समाधानकारक सांगड (अर्थात् कांहीं अपवाद सोडल्यास) आजची शिक्षित स्त्री घालूं शकत नाहीं. गरीब व मध्यम स्थितींतील कित्येक मुली संसार संभाळून कारकून अगर शिक्षिका म्हणून बाहेर ६-७ तास नोकरी करतात. अशाच कोणत्या तरी व्यवसायांत त्यांचे पती असतात. पण दोघांनींहि घरांत पाऊल टाकलें कीं त्यांचीं कर्तव्यें अगदीं भिन्न होतात. घर म्हटलें कीं सैंपाक, चहापाणी व मुलांचें सर्व काम पत्नीनेंच केलें पाहिजे










असा शतकानुशतकें दंडक पडलेला आहे. पण पुरुषा-इतकेंच काम बाई बाहेर जाऊन व्यवस्थित रीतीनें करते, तर पुरुषानें घरकामांत स्त्रीला मदत कां करूं नये? "हीं कामें बायकांचींच आहेत" असा शिक्का मारून सर्व घरकामांतून पुरुष आपली सुटका करून घेतात. पण हा शिक्का नाहींसा करण्यास पुरुषांनीं आतां शिकलें पाहिजे.

घर हें सहकार्यानें कष्ट करून आनंद व विसांवा निर्माण करण्याचें एकमेव स्थान आहे व सर्वांनीं सारखे श्रम केल्याखेरीज हा आनंद व विसांवा निर्माण होऊं शकणार नाहीं. १३० वर्षांपूर्वी शेलीनें 'The Revolt of Islam' या पुस्तकांत म्हटल्या-प्रमाणें 'Can man be free if woman be a slave'? याचा अर्थ असा मात्र मुळींच नव्हे कीं कुटुंबाच्या सर्व गरजा भागण्याइतकी पुरुषाची मिळकत असतांना स्त्रीनें आर्थिक स्वातंत्र्याच्या खुळया कल्पनेनें व हट्टानें ५० – ७५ रु. ची नोकरी करावी व गृहव्यवस्था बिघडवून पतीला दोष द्यावा. संसार हा श्रम-विभाग आहे व तो समजुतीनें व सहकार्यानेंच साधेल. घरांत १५ – २० रु. पगाराची बाई जेवण देऊन ठेवाव-याची व गृहिणीनें ५० रु. ची नौकरी करायची हें केव्हांही इष्ट नव्हे. पण जेथें दोघांनाहि नाइलाजानें बाहेर पडून अर्थार्जन करावेंच लागतें त्या कुटुंबांना उद्देशून माझें वरील विधान होतें. विवाह केल्यानंतर स्त्रीनें केव्हांहि कौटुंबिक कर्तव्यांनाच प्राधान्य दिलें पाहिजे. मुलांचें संगोपनहि आईप्रमाणें कोणताहि नोकर-मनुष्य करीत नाहीं. या दृष्टीनें पैसे वांचविणें हा पैसे मिळविण्याचाच एक मार्ग आहे. पाश्चात्त्य स्त्रिया धुणीं, भांडीं, सैंपाक-केरवाऱ्यापर्यंत सर्व कामें स्वतः करतात व तेंहि कमी प्रयासानें. याचें कारण हीं कामें करण्यास त्या आधुनिक यंत्रांचा उपयोग करतात. शें. ५० च्या वर कुटुंबांत 'व्हक्क्युम क्लीनर' असतो व कपडे शिजवि-ण्याची भट्टी, विजेवर चालणारी इस्त्री हें साहित्यहि बहुतेक सर्व घरीं असतें. यामुळें वेळाची बचत होते. व सर्व काम करूनहि त्या स्त्रियांचे चेहरे कधीं श्रांत व म्लान दिसत नाहींत. सारांश, वैवाहिक जीवनहि एकदा स्वीकारल्यानंतर व्यवसाय म्हणूनच त्यांचा अंगीकार केला पाहिजे व तें १०० टक्के यशस्वी करण्यासाठीं झटलें पाहिजे.

## प्राथमिक शिक्षण स्त्रियांकडेच सोंपवा

शिक्षणानें आकांक्षा खूप वाढाव्यात पण त्या पुऱ्या करण्यास योग्य असें सामाजिक अगर कौटुंबिक वातावरण मिळूं नये अशी आजच्या सुशिक्षित स्त्रीची परिस्थिति केविलवाणी झाली आहे. पाश्चात्त्य स्त्रियांना सामाजिक दर्जा व मताधिकार मिळविण्यासाठीं पुरुषवर्गाशीं ७५ वर्षें झगडावें लागलें. त्यांना या गोष्टी मिळविल्यानंतर त्यांनीं त्यांचा थोडाफार दुरुपयोगहि केला असेल. पण आमच्या समाजांत स्त्रीनें कांहींहि हातपाय न हालवितां तिला समान संधि व समान दर्जा हा पुरुषांनीं देऊन टाकल्यामुळें त्याचा कसा उप-योग करावा हेंहि आम्हांला तितकेंसें कळत नाहीं. थोडया प्रयासांनीं व मूठभर लोकांच्या कष्टानें देशाला स्वातंत्र्य मिळाल्यामुळें ज्याप्रमाणें स्वातंत्र्याचें मूल्य व जबाब-दाऱ्या आम्हांला कळत नाहींत तसेंच स्त्रियांच्या बाब-तींतहि झालें आहे. स्वतःला कोणत्या क्षेत्रांत चांगलें काम करतां येईल तें ठामपणें ठरवून तें क्षेत्र सर्वस्वीं आपणां-कडे यावें अशी मागणी आपण सरकारकडे केली पाहिजे. माझ्या मतें प्राथमिकपूर्व व प्राथमिक शिक्षण हें सर्वस्वीं स्त्रियांकडे सरकारनें सोंपवावयास हवें. सैनिक दलासार-ख्या कांहीं खात्यांत ज्याप्रमाणें स्त्रियांना प्रवेश देत नाहींत, त्याप्रमाणें ७ वर्षांपर्यंतच्या मुलांच्या शिक्षणसंस्थांत पुरु-षांना प्रवेश न दिल्यास निष्कारण मॅट्रिकपर्यंत शिकणा-ऱ्या मुली फायनल होऊन ट्रेनिंगकडे जातील व कोण-त्याहि ठिकाणीं त्या राहिल्या तरी संसार संभाळून त्यांना शाळेंत काम करतां येईल. साक्षरताप्रसारासारख्या सरकारी प्रयत्नांतहि स्त्रियांनाच प्रथम संधि मिळावी. अशा रीतीनें संसार सांभाळून ज्या व्यवसायांच्या प्रान्तांत स्त्रिया चांगलें काम करूं शकतात ते प्रान्त त्यांच्यासाठीं राखून ठेवल्यास उच्च यंत्रविज्ञानविषयक शिक्षण, सैनिकदल वगैरेंकडे पुरुषांचा ओघ अधिक वळेल.

शिक्षणक्रमांतहि अजून कितीतरी फेरफारांची जरूर आहे. स्त्रियांना उपयुक्त अशा कलांचा, गृहशास्त्रासारख्या विषयांचा समावेश आमच्या उच्च शिक्षणांतील अभ्यासक्रमांत व्हावयास हवा. एस्. एस्. सी. नंतर शिक्षिकांस उपयोगी असे १ – २ वर्षांचे डिप्लोमा-वर्ग सुरूं केल्यास बी. ए. होण्यांत निष्कारण वेळ व पैसे मुली वाया घालविणार

[ पुढील मजकूर पान ४६ वर पहावा. ]








प्रा. म. गं. नातू

# 'मराठी कादंबरी' : मूलग्राही समालोचन

प्रा. सौ. कुसुमावतीबाई देशपांडे यांच्या 'मराठी कादंबरी' * ह्या प्रबंधानें मराठी समीक्षणात्मक वाङ्मयांत मोलाची भर पडली आहे. आतापर्यंत कादंबरी ह्या वाङ्मयप्रकाराच्या समालोचनाचे मराठींत जे प्रयत्न झाले ते या प्रबंधाच्या तुलनेंत किरकोळ स्वरूपाचे वाटतात. ह्या प्रयत्नांपैकीं कांहीं केवळ तंत्राची चर्चा करणारे, कांहीं इतिहासवजा, तर कांहीं टीकात्मक आहेत; आणि तेहि बहुतांशीं त्रोटक, उथळ व कांहींसे ठोकळेबाज स्वरूपाचे. प्रस्तुत प्रबंधांत बाईंनीं मात्र मराठी कादंबरीवाङ्मयाचा सर्वांगीण विचार केला आहे. त्यांनीं मराठी कादंबरीच्या सुमारें शंभर वर्षांपूर्वी झालेल्या उगमापासून तों थेट आतांपर्यंत झालेल्या तिच्या विकासाचें सिंहावलोकन तर केलें आहेच; पण तें करीत असतांना लेखकाचें व्यक्तिमत्त्व व तत्कालीन परिस्थिति यांचाहि विचार केला आहे आणि अशा बहुविध दृष्टींनी विविध कादंबऱ्यांचें अंतरंग उकलून दाखविलें आहे. तसेंच ह्या व्यापक आणि मूलग्राही दृष्टीला त्यांनीं सौजन्याची जोड दिली असल्यामुळें कादंबरीकारांच्या अपयशाची मीमांसा करतांनाहि कटुता निर्माण झालेली नाहीं.

या ग्रंथाची प्रस्तावना पुढील विवेचनाची पार्श्वभूमि तयार करणारी असल्यामुळें महत्त्वाची आहे. तिच्यांत टीकाकार या नात्यानें वामन मल्हार जोशी यांचे विशेष, कादंबरीवाचनाचे हेतू, चिरस्थायी कलेची कसोटी, काव्य व कथा यांतील भेद इत्यादि प्रश्नांची संक्षिप्त परंतु मार्मिक चर्चा केली आहे. बाई जरी कलाप्रेमी असल्या तरी त्यांच्यावर जीवनवादी दृष्टिकोणाचा विशेष प्रभाव पडलेला दिसतो. त्यांच्या मतें चिरस्थायी कलेचा हेतु केवळ मनोविनोदन किंवा उद्दीपन नसतो. अभिजात कला वाचकाच्या अनुभूतीचें क्षेत्र वाढविते, त्याच्या सहानुभूतीचा विकास करते व "मानवी मनाच्या सर्व प्रवृत्तींना साकल्यानें आवाहन करते." तसेंच व्यक्तिचित्रणाबद्दल त्या लिहितात कीं, "व्यक्तिचित्रण जीवनाच्या विशालतर पार्श्वभूमींतून उद्भवलेलें नसेल तर त्यांत निर्जीवता येते." बाईंचा हा दृष्टिकोण बहुतेकांना पटण्यासारखा आहे. परंतु त्यानंतर कलेंतील तादात्म्याचें महत्त्व सांगतांना बाईंनीं वामन मल्हार जोशी यांच्या तादात्म्यावरील विवेचनावर जो आक्षेप घेतला आहे तो विवाद्य वाटतो. तादात्म्याच्या काटेकोर अर्थाविषयीं व वामनरावांच्या भूमिकेविषयीं बाईंचा गोंधळ झालेला दिसतो. तादात्म्याच्या उपपत्तींतील जोशांनी दाखविलेल्या अपुरेपणाकडे बाईंचें दुर्लक्ष झालें आहे. पान १० वर बाई लिहितातः "कलाकृतीचें अधिष्ठान तादात्म्यावर असतें ही कल्पना वामन मल्हारांना विशेष मान्य नव्हती. केळकरांच्या काव्यानंदाच्या सविकल्प समाधीच्या उपपत्तीमध्यें त्यांना मुख्य अडचण भासली ती अशी : गाय व वासरूं यांच्या एकाद्या चित्राचा आस्वाद घेतांना रसिकाचें किंवा तें काढतांना चित्रकाराचें कशाशीं तादात्म्य होतें ? गाईशीं, वासराशीं कीं दोघांशीं ? अशा प्रकारच्या प्रश्नांची सरबत्ती करून ही उपपत्ति जवळजवळ हास्यापद ठरविण्याची त्यांची इच्छा असावी. परंतु ती तशी मुळींच ठरत नाहीं.......आपणांसारख्या सुबुद्ध, तत्त्वज्ञ मनुष्यानें गाईशीं तादात्म्य पावण्याची कल्पना त्यांना एवढी चमत्कारिक वाटण्याचें कांही कारण नव्हतें. पुरातन भारतीय तत्त्वज्ञानी वा कलापंडितांनी तें तसें मानलें नाहीं."

वास्तविक पाहातां जोशांनीं तादात्म्यावर म्हणजे केळकरांच्या 'समाधि' शब्दावर – जो आक्षेप घेतला तो मुख्यतः तादात्म्यास काव्यानंदाचें एकमेव कारण मानण्याबद्दल होता हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. कलेंतील समरसत्वाचें महत्त्व त्यांना मान्य होतें; व

* 'मराठी कादंबरी' [पहिलें शतक] १८५०–१९५० लेखिका : प्रा. कुसुमावती देशपांडे एम्. ए. प्रकाशक :— मुंबई मराठी साहित्य संघ (१९५३). पानें २२५. मूल्य साडेतीन रुपये.









अनुक्रमणिका

म्हणूनच ह्या आवश्यक अंगाचा उल्लेख केल्याबद्दल केळकरांना त्यांनीं श्रेयहि दिलें. परंतु त्याचबरोबर काव्यानंदाच्या इतर कारणांकडे दुर्लक्ष करणें बरोबर नाहीं असे त्यांचें मत होतें. बाई लिहितात त्याप्रमाणें सविकल्प समाधीची उपपत्ति त्यांना हास्यास्पद ठरवावयाची नव्हती; तर काव्यानंदाचें हें एकमेव कारण ठरविल्यास तिच्यांतील अपुरेपणा दाखवावयाचा होता. तादात्म्य हें काव्यानंदाचें एकमेव कारण नव्हे एवढेंच सांगून ते थांबले नाहींत. तर काव्यानंदाचीं इतर ९ महत्त्वाचीं कारणेंहि त्यांनी दिलीं आहेत. ही त्यांची कारणमीमांसा पाहिल्यास त्यांच्या विवेचनाचें सत्यस्वरूप कोणाच्याहि लक्षांत येईल. त्यांनी अशी साधकबाधक चर्चा केली असतांनाहि बाईंनी " आपणांसारख्या सुबुद्ध......
कारण नव्हतें " अशी अनुदार शंका त्यांच्यासंबंधीं व्यक्त करावी हें चमत्कारिक वाटतें. कारण वामनरावांना आपल्या सुबुद्धतेचा, तत्त्वज्ञानीपणाचा किंवा मानव्याचा अहंकार असेल असा यत्किंचित्हि पुरावा त्यांच्या जीवनांत व वाङ्मयांत आढळत नाहीं. खरें म्हटलें म्हणजे तादात्म्याचा काटेकोर अर्थ लक्षांत घेऊन जोशांनीं आपली शंका मांडली होती. ' केवळ गायवासरांशींच नव्हे तर रमणीय अशा नदी, पर्वत, सूर्यास्त आदि नैसर्गिक देखाव्यांशींहि तादात्म्य पावावयाचें म्हणजे काय ? ' असा त्यांचा प्रश्न होता. वास्तविक ह्या वस्तूंतील रम्यत्वामुळें त्या आपल्याला मोहवितात. या मुग्ध होण्यास तादात्म्य म्हणावयाचें असेल तर त्याचें कारण वस्तुगत रमणीयता, उदात्तता इत्यादि गुण आहेत. म्हणून ह्या गुणांची पूर्ण उपेक्षा करून केवळ तादात्म्यावरच सर्व भर देणें त्यांना मान्य नव्हतें व तें बरोबरच वाटतें.

प्रस्तावनेनंतरच्या ' कादंबरीचा उगम ' या प्रकरणांत बाईंनीं मराठींतील आद्य कथावाङ्मय व मराठेशाहींतील गद्यरचना यांचा थोडक्यांत आढावा घेऊन मराठी कादंबरीची सामग्री कशी तयार होत होती हें दाखविलें आहे. त्यांच्या मतें बखरी, फड्यां कारकुनांनी व चिटणिसांनीं लिहिलेले लेख, पोवाडे, हातगे इत्यादि कादंबरीची सामग्रीच होय. तसेंच त्या लिहितात : " मोरोपंतांचीं महाभारताचीं पर्वें, रामायणाचे प्रकार, श्रीधराचा ' रामविजय ', वामनपंडिताचीं आख्यानें म्हणजे एक प्रकारच्या कादंबऱ्याच ". ( पा. १९ ).

बाईंच्या मतें ' आधुनिक कादंबरी ' व ' कीर्तन आणि पोवाडे ' यांत तंत्रदृष्ट्या एकच मूलगामी फरक व तो म्हणजे गद्य आणि पद्य या माध्यमांचा. तेव्हा त्या लिहितात : " एवढा फरक घडून येण्यासाठीं इंग्रजी आक्रमणाची व संस्कृतिसंघर्षाचीं आवश्यकता होती का ? कादंबरीच्या निर्मितीसाठी खरी आवश्यकता कशाची असेल तर ती मुद्रणकलेची ". ( पा. २० ). " मराठशाहींतील गद्यरचनेच्या प्रकारांची आठवण बुजली नसती,... तर या फारसी किंवा इंग्रजी साहाय्याशिवायहि मराठी कादंबरीची उत्क्रांति झाल्याशिवाय राहिली नसती, असें निश्चितपणें म्हणतां येईल ". ( पा. १८ ).

बाईंचें वरील मत वादग्रस्त वाटतें. त्यांच्या मतें मराठी कादंबरीच्या उत्क्रांतीस एकमेव अडथळा म्हणजे मुद्रणकलेचा अभाव; कारण त्यामुळें तत्कालीन लेखकांना पद्याचा आश्रय घ्यावा लागला. पण मुद्रणकलेच्या अभावींहि बाराव्या शतकापासून मराठींत गद्य वाङ्मय लिहिलें जाऊं लागलें होतें ना ? मग असें असतांना पुढील सहाशें वर्षांच्या दीर्घ कालावधींत कादंबरी कां निर्माण होऊं शकली नाहीं ? आणि केवळ मुद्रणकलेच्या आगमनानें मात्र ती निर्माण होऊं शकलीच असती हें कशावरून ? तसेंच ' आधुनिक कादंबरी ' व ' कीर्तन आणि पोवाडे ' यांत केवळ माध्यमाचाच फरक आहे हें त्यांचें मत सर्वस्वीं पटण्यासारखें नाहीं. प्रत्येक वाङ्मयप्रकाराचे स्वतःचे असे कांहीं खास विशेष असतात. कादंबरीचेच कशाला ? मराठी काव्याची एवढी प्रदीर्घ व उज्ज्वल परंपरा असूनहि ' आधुनिक ' म्हणून ओळखलें जाणारें काव्य लिहितांना केशवसुतांना इंग्रजी कविताच पुढें ठेवावी लागली ना ? काव्यास तर मुद्रणकलेच्या अभावाचा अडथळा नव्हता. मग इंग्रजी वाङ्मयांतील सुनीत, भावगीतादि प्रकार स्वतंत्रपणें मराठींत कां येऊं शकले नाहींत ? या बाबतींत सरवट्यांचें मत सत्यशोधकाच्या भूमिकेस अधिक जवळचें व समतोल वाटतें. कारण ते म्हणतात कीं इंग्रजी व फारसी वाङ्मयाच्या साहाय्याशिवाय " कादंबरीचा प्रकार कितपत विकास पावला असतां हा प्रश्न आहे. " बाईंच्या विधानांतील " असें निश्चितपणें म्हणतां येईल " हे शब्द सरवट्यांच्या शब्दांपेक्षां आग्रही स्वरूपाचे वाटत नाहींत का ?








याच प्रकरणाच्या पुढील भागांत आद्य मराठी कादंबरी 'यमुनापर्यटण' (१८५७) हिचें परीक्षण करून तिच्यांत मराठी कादंबरीच्या भावी विकासाचीं बीजें दाखविलीं आहेत. ही कादंबरी बाबा पदमनजी या बाटलेल्या माणसानें लिहिली व तीहि खिस्ती धर्माच्या प्रशंसेकरितां. त्यामुळें सामान्यपणें आतांपर्यंत तिची उपेक्षा झाली. पण बाईंच्या मतें मराठी कादंबरीच्या उत्क्रांतींत हिचें स्थान मोठें आहे. त्या लिहितात : "समाजपरिवर्तनाबद्दल उत्कट आकांक्षा, सहृदयता व भाषेची अनलंकृत सरलता या सर्व गोष्टींत ही कादंबरी म्हणजे हरि नारायण आपट्यांच्या वाङ्मयकृतींचें पूर्वचिन्ह होय." (पा. २५). हरि नारायण आपट्यांसारख्या अभिजात लेखकाची जणूं पार्श्वभूमीच दर्शविणाऱ्या या कलाकृतीचें महत्त्वमापन आतांपर्यंत टीकाकारांच्या अपुऱ्या आस्थेमुळें होऊं शकलें नव्हतें. परंतु बाई मात्र तिचें यथार्थ दर्शन घडवूं शकल्या ह्याचें श्रेय त्यांच्या पूर्वग्रहशून्य दृष्टीस आहे.

या कादंबरीनंतर निर्माण झालेल्या हळबे, रिसबूड, पारखी आदि लेखकांच्या अद्भुतरम्य कादंबऱ्यांचें विवेचनहि बाईंनीं मोठ्या साक्षेपानें केलें आहे. या कादंबऱ्यांतील अलंकारप्राचुर्य, करमणूकप्रधानता व अद्भुतरम्यता ह्या दोषांना तत्कालीन सुखवस्तु व कार्यशून्य वाचकवर्गहि थोडाफार कारणीभूत होता हें दाखविण्यास त्या विसरल्या नाहींत. तसेंच बालिश वृत्तीच्या मनोविनोदनापलीकडे मराठी भाषेच्या पोषणाचें ह्या कादंबऱ्यांनी केलेलें कार्य दाखवून यशाचें योग्य माप त्यांच्या पदरांत त्यांनीं टाकलें आहे. एवढेंच नव्हे तर पुढें निर्माण होणाऱ्या फडक्यांच्या कादंबऱ्या व ह्या कादंबऱ्या ह्यांच्या निर्मितीमागील वृत्ति तत्त्वतः एकच कशी आहे हेंहि त्यांनीं दाखविलें आहे. (पा. ३५). आज अफाट लोकप्रियता लाभलेल्या फडक्यांच्या कादंबऱ्या आणि ह्या कादंबऱ्या यांच्या तोंडवळ्याचें बाईंच्या सूक्ष्म दृष्टीनें हेरलेलें हें साम्य वाचकांना मोठें मार्मिक वाटेल.

यापुढील 'ऐतिहासिक कादंबरी' या प्रकरणांत गुंजीकर, ना. ह. आपटे, नाथमाधव, हडप इत्यादींच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचा आढावा घेतला आहे. त्यांत गुंजीकर व हडप यांच्यासंबंधीं पुढील प्रशंसोद्गार काढले आहेत. गुंजीकरांनी आपल्या 'मोचनगड' ह्या "पहिल्याच कृतींत ऐतिहासिक कादंबरीचा आदर्श घालून दिला. त्यांच्यानंतर हरि नारायणांनीं हाच कित्ता गिरविला व त्याला अधिक भरदारपणा व विशालता प्राप्त करून दिली" (पा. ४४). "हडपांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांमुळें महाराष्ट्रांतील कांहीं नव्या पिढ्यांना जुन्याची आठवण व इतिहासाची तोंडओळख तरी ठेवणें सुलभ झालें आहे." (पा. ६७).

अलीकडे चर्चिल्या गेलेल्या "आजची राजकीय कादंबरी उद्यां ऐतिहासिक ठरेल काय?" या प्रश्नाचा बाईंनीं या ठिकाणीं विचार केला आहे. त्यांच्या मतें ह्या दोन कथाप्रकारांच्यामागील लेखकाच्या मानसिक प्रक्रिया भिन्न असल्यामुळें हे "कथाप्रकार अलगच ठेवलेले बरे."

मराठी कादंबरीच्या बहुमानाचें शेलापागोटें निःसंशयपणें ज्यांच्याकडे जातें त्या हरि नारायण आपट्यांवरील विवेचनांत बाईंची लेखणी अधिक रंगणें स्वाभाविक आहे; म्हणून त्यांच्यावर त्यांनीं एक स्वतंत्र प्रकरणच लिहिलें आहे. त्या लिहितात : "बाळबोध वळणाच्या साध्या, सरळ, कुटुंबवत्सल माणसाचें चित्रण हें हरि नारायणांचें खरें वैशिष्ट्य. खेळकर पोरीबाळी, अभ्यासी सोज्वळ मुलें यांच्याभोवतीं त्यांची प्रतिभा रमते व त्याहूनहि दुःखी-कष्टी पण प्रेमळ सासुरवाशीणीभोंवतीं." (पा. ७५). "'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरीच्या अंगोपांगांत नावीन्य भरलें आहे" (पा ८०); "'वज्राघाता'चें पहिलें प्रकरण अभिजात वाङ्मयाच्या स्मृतींनीं दरवळलें आहे." (पा. ११४). "हरि नारायणांचा सामाजिक दृष्टिकोण प्रगतिशील व मानवतापूर्ण होता. इतिहास वाचावा कसा व त्यांत जीव भरावा कसा, याचा त्यांना स्पष्ट उमज होता." (पा. ११९) – इत्यादि अनेक प्रशंसोद्गार जागोजागीं आढळतात.

आपट्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांवर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांना बाईंनीं काळजीपूर्वक उत्तरें दिलीं आहेत. स्कॉटच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत सामाजिक रीती वेषभूषा, दिनचर्या यांची ज्याप्रमाणें स्पष्ट कल्पना वाचकांसमोर उभी राहते त्याप्रमाणें आपट्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत राहत नाहीं. या आक्षेपास उत्तर देतांना बाई म्हणतात कीं इंग्रजी इतिहासांत

" तत्कालीन वास्तुशिल्पापासून चहाच्या पेल्यापर्यंत सर्व सामग्रीची माहिती मिळूं शकते. आमच्या इकडे ती शोधूं म्हटल्यानें दृष्टीस पडणार नाहीं; ती कधीं ठेवली गेलीच नाहीं." (पा. १२१). "हरि नारायणांचें शिवदर्शन अपुरें आहे, अस्पष्ट आहे, असें पुष्कळदां म्हटलें जातें. परंतु त्यांच्या काळीं ऐतिहासिक सामग्रीची केवढी उणीव होती याची आठवण ठेवणें ऐतिहासिक दृष्टीला आवश्यक आहे. " ( पा. १०८).

लेखकाचें व्यक्तिमत्त्व व जीवन त्याच्या लिखाणांत प्रतिबिंबित होत असतें हें लक्षांत घेऊन आपट्यांच्या कादंबऱ्यांचें विवेचन करतांना बाईंनीं त्यांच्या वैयक्तिक जीवनाकडेहि मोठ्या आस्थेनें लक्ष पुरविलें आहे. ' गणपतराव ' कादंबरीच्या परीक्षणांत त्या लिहितात: " आपल्या स्वतःच्या अशिक्षित पत्नीनें लिहिण्या-वाचण्यास शिकावें, आपल्याला पत्रें पाठवावीं, अशी त्यांची केवढी मनीषा होती. ' प्रेमाचें पत्र ' हें अशा पत्रलेखना-विषयींचें प्रकरण तर हरि नारायणांनीं सरळ स्वतःच्या अनुभवांतून उतरवलें ...... ही प्रतीतीची गंगा मराठी कादंबरीच्या विश्वांत प्रथमच येथें अवतरली ". ( पा. ७८ ). ' वज्राघात ' कादंबरीच्या परीक्षणांत त्या म्हणतात : "ही कादंबरी हरि नारायणांनीं लिहावयास प्रारंभ केला तेव्हां व ती लिहीत असतांना त्यांच्यावर एकामागून एक वज्राघात झाले. त्या व्याकूळ मनःस्थितीमुळेंच त्यांना मानवी आकुलतेचें इतकें विविध व परिणामकारी चित्रण करण्याची शक्ति आली असेल का ? " ( पा. ११७ ).

या थोर लेखकाबद्दल बाईंनी काढलेले पुढील उद्गार चिंत्य आहेत : " कादंबरीलेखनाचे अंतिम निकष लावूं लागल्यास,...हरि नारायणानंतर अर्थगौरव, भावगांभीर्य, रचनाकौशल्य व भाषालालित्य या चारहि गुणांनीं समन्वित व पात्रांच्या अंतःस्फूर्त विकासानें फुललेल्या अशा कथा लिहिणाऱ्या लेखकाची मराठी कादंबरी अजून वाटच पाहात आहे ". ( पा. १८३ ).

यानंतरच्या ' वाचकवर्गाची वाढ ' या प्रकरणांत नियतकालिकें व वर्तमानपत्रें यांच्या वाढीबरोबर मराठी साहित्याच्या सरितेचें पात्र कसें रुंदावत गेलें हें दाखविलें आहे; व त्यानंतर नाथमाधव, हडप, ना. ह. आपटे व य. गो. जोशी यांच्या कादंबऱ्यांचें स्वरूप व कार्य सांगितलें आहे. हडपांच्या कादंबऱ्यांविषयीं त्या लिहितात : " प्रथमावस्थेतील त्यांच्या कादंबऱ्यांत वैषयिक वर्णनाचा हव्यास दिसून येतो. नीतिनियमांचा पुरस्कार व स्वैराचाराचा निषेध हे त्यांच्या लेखनांचे उघड हेतू वाटले तरी अभावितपणें व उत्कटपणें वाचकांचें लक्ष अनाचाराच्या रम्यतेवर खिळविलें जातें... स्वैराचारावर सूचकपणें आकर्षकत्वाचा मुलामा चढल्याशिवाय राहत नाहीं. " या त्यांच्या विधानांत सूचित झालेला कला व नीति यांच्या संबंधाविषयींचा दृष्टिकोण मननीय आहे. या दोषदर्शनाबरोबरच " आज मराठी कादंबरीला जें वस्तुनिष्ठेचें व सामाजिक विश्लेषणाचें वळण लागत आहे, त्या वळणावरील पहिलीं कांहीं पावलें हडपांचीं आहेत " ( पा. १३४ ) असें म्हणून त्यांना मराठी कादंबरीच्या उत्क्रांतीस हातभार लावल्याचें श्रेयहि दिलें आहे. तसेंच " ना. ह. आपट्यांच्या कृतींनीं मध्यमवर्गाचें मत जसें रिझविलें, खेळविलें गेलें तशी त्याची उभारहि वाढविली गेली " ( पा. १४२ ) हा ना. ह. आपट्यांच्या कार्याचा विशेष दाखविला आहे.

पुढील ' वामन मल्हारांचें युग ' या प्रकरणांत वा. म. जोशी व डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांचा सविस्तर परामर्श घेतला आहे व मराठी कादंबरीच्या विकासांतील त्यांची कामगिरी दर्शविली आहे. "वामन मल्हारांनीं मराठी कादंबरीला यापूर्वी कधींहि लाभलें नव्हतें असें तत्त्ववैभव प्राप्त करून दिलें." (पा. १६३). " डॉ. केतकर एकप्रकारें समाजजीवनाचे सीमारक्षकच ...तत्कालीन मराठी कादंबरीचें जें सामान्यतः क्षेत्र दिसतें त्याच्यापलीकडे केतकरांच्या निर्मितीचें क्षेत्र सुरू होतें ". ( १८० ).

' वामन मल्हारांचें युग ' या प्रकरणानंतर येणाऱ्या प्रकरणांत बाईंनीं मुख्यतः वरेरकरांच्या कादंबऱ्यांची चर्चा केली आहे. या प्रकरणास त्यांनीं ' तत्त्वप्रधान कादंबरी ' हें नांव देण्याचें प्रयोजन कळत नाहीं. जोशी व केतकर यांच्या कादंबऱ्यांपेक्षा वरेरकरांच्या कादंबऱ्या बाईंना अधिक तत्त्वप्रधान वाटत असल्यास नकळे !

या शेवटच्या प्रकरणांत आतांपर्यंत कांहींशा उपेक्षिल्या गेलेल्या वरेरकरांच्या कादंबऱ्यांचें बाईंनीं स्वतंत्र व उदार दृष्टीनें मूल्यमापन केलें आहे. तें कोणास पक्षपाती व अतिशयोक्त वाटण्याचा संभव असला तरी बाईंनीं त्यांत व्यक्त केलेला दृष्टिकोण विचारार्ह आहे. त्या








लिहितातः " वरेरकरांचा काळ म्हणजे वास्तविक विस्मृतिवादी कादंबरीच्या ऐन बहाराचा काळ...... या पलायनवृत्तीच्या काळांत वरेरकरांनीं वास्तववादाचें निशाण फडकतें ठेवलें. जीवनाचें निरीक्षण, निरूपण व उन्नयन करण्याच्या कार्यापासून मराठी कादंबरीला त्यांनीं परावृत्त होऊं दिलें नाहीं, उदार तत्त्वांना सावरून धरलें व उपेक्षितांची बाजू घेतली." वरेरकरांनीं जे प्रश्न हातीं घेतले ते त्यांना यशस्वीपणें हाताळतां आले नसतील; पण याचें कारण बाईंच्या मतें ते प्रश्नच दुष्कर होते. "आजच्या आपल्या सामाजिक समस्या व आर्थिक गुंतागुंत मागल्या कोणत्याहि काळांतील संघर्षाला लाजवतील यांत संशय नाहीं व त्यांच्या निरूपणांत वरेरकरांची एकट्याचीच प्रतिभा अपुरी पडते, असेंहि नाहीं." (पा. २०४).

एकंदरींत, प्रगाढ व्यासंग, मूलग्राही व व्यापक दृष्टि, निर्भय वृत्ति, नवदर्शनसामर्थ्य इत्यादि विविध गुणांनीं भूषित अशा ह्या ग्रंथाच्या देणगीबद्दल मराठी वाचकवर्ग लेखिकेचा ऋणी आहे आणि या ग्रंथाच्या दुसऱ्या भागाच्या प्रकाशनाची आतुरतेनें वाट पाहात आहे.

---

## स्त्रियांचें शिक्षण आणि व्यवसाय [ पान ४१ वरून चालू ]

नाहींत. जीवन कसें जगावें हें शिक्षणानें कळावयास हवें. आजचें शिक्षण जीवनांतील महत्त्वाच्या प्रश्नांवर कांहीं प्रकाश टाकूं शकत नाहीं. भूक नसतांना अगर पचविण्याची शक्ति नसतांना अन्न खाल्ल्यास जसे दुष्परिणाम होतात, त्याचप्रमाणें घोड्याला झांपड लावल्याप्रमाणें प्राथमिक शाळा संपली कीं हायस्कूल, हायस्कूल संपलें कीं कॉलेज अशा रीतीनें मुली पदवी घेतात. व पुढें काय हा प्रश्न त्यांना सुटत नाहीं. मग निराश वृत्तीनें एकीकडे नोकरीची खटपट व दुसरीकडे लग्नाची खटपट अशा दुहेरी कात्रींत त्यांची अगदीं केविलवाणी स्थिति होते. जीवन कसें जगावें हा प्रश्न जर शिक्षणालाच सोडवितां आला तर व्यवसायाचें मार्गदर्शन वेगळें करण्याची जरूरच राहणार नाहीं. मिसेस् स्नोडननीं 'The Feminist Movement' या पुस्तकांत स्त्रियांच्या जीवनादर्शाबद्दलहि असेंच म्हटलें आहे : " Feminism should not seek the extinction of strength and courage in men, nor of beauty, softness and tenderness in women, but the heritage of men and women alike; the achievement of freedom for womanhood and its equality of opportunity with manhood – that should be the chief purpose of the woman movement."

---

### फुलावीं अंगणीं —!

फुलावीं अंगणीं<br>
बकुळ चमेली<br>
ऊन - सांवल्यांची<br>
काढीत रांगोळी<br>
रंगांतून अंग<br>
निथळून जावें<br>
गंधांतून बिंग<br>
आकळून घ्यावें<br>
तसेंच फुलावें<br>
तसेंच डुलावें<br>
गंधांत, रंगांत<br>
सुकूनीया जावें !

— राजा मंगळवेढेकर








## पुढेंच पडुं दे तुझीं पाउलें !

पुढेंच पडुं दे तुझीं पाउलें
निर्मीत तेजाचीं अनंत वलयें
आणि उजळीत रे भाग्यरेखा दीनदलितांची
सुकेल्या-खंगल्या, रंजल्या-गांजल्या
उपाशीतापाशी आणि अर्धपोटी तीस कोटींची !
पुढेंच पडुं दे तुझी पाउलें !

— तेव्हां झाली होती
कुणा द्रष्टयाच्या तरल प्रतिभेंत वीज प्रस्फूर्त
आणिक एका सोनियाच्या क्षणीं
झळाळत आली अमर वाणी:
'भूमि माझी माता,
पुत्र मी पृथ्वीचा, भूमि माझी माता'[१]
मातीच्या कणाला आकळली होती
आईची कूस, सोन्याची मूस
गंधित श्यामल आणि क्षमाशील माता धरित्री !
परी पोरांनींच
तोडलें आईला, केलें विच्छिन्न शतखंडित
उभे आडवे वेडेवांकडे तुकडे तुकडे
केली ताटातूट
कुणा कसाबांनीं
मायलेंकरांची.
— आणि आज
तुझिया दुबळया देहयष्टींत अदम्य उत्साह
अंगकाठीच्या अणुरेणूंतून
खळाळते आहे उफाळते आहे
फेंसाळलेली अग्निजान्हवी
विषमतेचें जाळीत तण
मेल्या मनांतला फुंकीत स्फुलिंग
उजाड, ओसाड आणिक रेताड
माळकातळ बरड टेंकाड मरुभूमिहि
आघवें करीत सस्यश्यामल चैतन्य शिंपून.

पुढेंच पडुं दे तुझीं पाउलें !
पुढेंच पडुं दे तुझीं पाउलें
भेटव आईला तिचीं लेंकरें
आणिक कळूं दे अलम् दुनियेला
देवांच्या प्रिय कर्मभूमींतला नवा प्रयोग
दानाचा त्यागाचा कांचनमुक्तीचा.
माणुसकीचें नवें उधाण
इतिहासाचें नवीन पान
स्तिमित झालेले
हिंसक निषाद लोभी पिशुन !
अमंगलाला मांगल्याचें चिर आवाहन
कुरूपतेला सौंदर्याचें नवें वरदान
दानवतेला मानवतेचा अमर उ:शाप !

अरे महर्षे !
तुवां शिकविला यंत्रयुगांतल्या पिचल्या मानवाला
'द'कारांतल्या 'दत्त'[२] आदेशाचा आगळा अर्थ
तुवां दाविलें 'द'त दडलेलें जीवनदर्शन !
तूं धन्य तूं धन्य !
तुझिया स्मितांत मानवतेचें हंसरें भविष्य
तुझिया नयनीं भवितव्याला
शुभंकराचें शिव आश्वासन
रे दिव्यदर्शी मांगल्यशिल्पी !
असाच आक्रमी अमृताचा घाट प्रकाशाची वाट
पूर्व दिशेंत कृत्तिकेचा ध्वज
अग्निनक्षत्राचा[३] उभव नीट

आतां नाहीं दूर, क्षितिजाच्या पार
डोंगरापल्याड प्रसन्न पहांट
निकट येताहे येताहे निकट द्रुतगतीनें
महर्षे ! तुझिया कृत्तिकाध्वजाचा
घेत मागोवा येताहे पहांट

आणि अनंतहस्तांनीं सांवरीत
कटिखांद्यावर डुचमळणारे प्रकाशाचे घट
येताहे पहांट !
पुढेंच पडुं दे तुझीं पाउलें !
पुढेंच पडुं दे तुझीं पाउलें ! !

— मधु वाबगांवकर

१ 'माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्याः ।'
२ 'दत्त दाम्यत दयध्वम् ।'
३ 'कृत्तिकास्वग्नीऽआदधीत । एता वा अग्निनक्षत्रम् । एता ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते ।'

श्री. शा. म. जोशी

# बेरियाचा खटला व साम्यवादी न्यायदान : कांहीं मूलभूत प्रश्न

१९५३ च्या जुलै महिन्यांत सोव्हिएट राज्ययंत्रांतील एक प्रमुख व्यक्ति एल्. पी. बेरिया याला पक्ष व देशाविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून अधिकारावरून दूर करण्यांत आलें. डिसेंबर १७ ला बेरिया व त्याचे देशद्रोही सहकारी यांची सुप्रीम कोर्टामार्फत चौकशी होईल असें जाहीर झालें. दिनांक २३ डिसेंबरला कोर्टानें दोषी ठरविल्यामुळें सहा सहकाऱ्यांबरोबर रशियांतील पूर्वीचा दुय्यम प्रधानमंत्री बेरिया याला गोळी घालून देहान्त शासन देण्यांत आलें. — वरील घटना मोठ्या वेगानें घडून आल्या, त्या घटनांत रशियांतील एका काळची श्रेष्ठ व्यक्ति प्रमुख होती, या घटनेनें जगांतील सर्व लोकांचें लक्ष वेधून घेतलें–एवढ्यामुळेंच हें प्रकरण महत्त्वाचें व गंभीर स्वरूपाचें आहे असें नाहीं. बेरियाची न्यायालयीन चोकशी, त्याला देण्यांत आलेली देहान्त शिक्षा या गोष्टी दिसावयास भडक व नुसत्याच चुरचुरीत बातम्या एवढ्याच स्वरूपाच्या नसून त्या कांहीं गंभीर तात्त्विक प्रश्न निर्माण करतात.

भांडवलशाही समाजव्यवस्थेंतील कायदा व न्याय आणि समाजसत्तावादी किंवा साम्यवादी समाजांतील कायदा व न्याय यांच्या मूलभूत स्वरूपाबद्दल कांहीं महत्त्वाचे प्रश्न या घटनेच्या अनुषंगानें विचारांत घेणें जरूर आहे. बेरिया खरोखर देशद्रोही होता किंवा नाहीं, त्याला दिलेली शिक्षा न्याय्य होती किंवा नव्हती हे प्रश्न वास्तविक गौण आहेत. प्रसिद्ध झालेले आरोप जर सिद्ध झाले असतील तर त्याला व त्याच्या सहकाऱ्यांना दिलेली शिक्षा रास्त होती असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. पण खरा मुद्दा त्याला ज्या पद्धतीनें दोषी ठरवून व ज्या झटापटीनें त्याचा शेवट झाला त्या पद्धतीमुळें साम्यवादी राजवटींतील न्यायाबद्दलहि कसून विचार व्हावा अशी परिस्थिति निर्माण झाली आहे.

### सोव्हिएट राज्यघटनेंतील कलम

भांडवलशाही देशांतील राज्यघटनांतून व्यक्तिस्वातंत्र्याचा उल्लेख व उच्चार असला तरी तें व्यक्तिस्वातंत्र्य पुष्कळ वेळां कायद्यानेंच इतकें मर्यादित करण्यांत आलेलें असतें कीं तें बहुधा नाममात्र ठरतें. शिवाय ज्या समाजांत व्यक्तीस जीवन जगावयाचें असतें त्या समाजाचें उद्दिष्ट व रचना व त्यांमुळें व्यक्तीच्या कर्तव्याच्या क्षेत्राचा होणारा संकोच यामुळेंहि त्या स्वातंत्र्यावर बंधनें पडत असतात. हें व्यक्तिस्वातंत्र्य प्रत्यक्षांत आणून प्रत्येक नागरिकाच्या विकासास पुरी संधि देण्याची धुरा समाजवादी राज्यांनीं घेतलेली आहे. १९३६ सालीं नव्या सोव्हिएट राज्यघटनेच्या मसुद्याचा पुरस्कार करतांना स्टॅलिननें पुढील उद्गार काढलेले आहेत : “ या नव्या राज्यघटनेच्या मसुद्याचें वैशिष्ट्य असें आहे कीं, नागरिकांच्या हक्कांची नुसती यादी मांडून हा मसुदा थांबत नाहीं, तर त्या हक्कांची हमी देऊन प्रत्यक्षांत ते कसे येतील याची पण व्यवस्था करतो. हा मसुदा लोकशाही स्वातंत्र्याची नुसती घोषणा करीत नाहीं, तर तें स्वातंत्र्य प्रत्यक्षांत येण्यासाठीं खास व्यवस्था करतो. ” – ( अठराव्या काँग्रेसपुढील घटनेच्या मसुद्यावरील भाषण, पृ. १७–१८, लोकप्रकाशनगृह-आवृत्ति ). वरील उताऱ्यांत स्टॅलिननें समाजवादी राज्यघटना कागदी हक्क प्रत्यक्षांत कसे आणते याचें दिग्दर्शन केलें आहे. कोणत्याहि व्यक्तीला योग्य कारणाशिवाय व जबाबदार न्यायालयाच्या परवानगीशिवाय अटक करण्यांत येऊं नये हा व्यक्तीचा हक्क भांडवलशाही राष्ट्रांच्या राज्यघटनांत अंतर्भूत करण्यांत आला आहे. सोव्हिएट राज्यघटनेच्या १२७ व्या कलमाप्रमाणें नागरिकाच्या सुरक्षिततेची हमी देण्यांत आली असून कोर्टाच्या अगर सरकारी वकीलाच्या परवानगीशिवाय कोणासहि अटक करण्यांत येऊं नये अशी व्यवस्था आहे. पण या स्वातंत्र्यावर राज्यकर्त्यांनीं गदा आणल्यास बाट काय ?– या प्रश्नाला मात्र सोव्हिएट घटनेंत स्पष्ट असें उत्तर दिसत नाहीं. आपल्या भारतीय राज्यघटनेंतील २१ व्या व २२ व्या कलमांत अनधिकृत अटकेबद्दल स्पष्ट व्यवस्था केलेली दिसते. ही व्यवस्था अगदीं आदर्श आहे, असें नाहीं; कारण २२ व्या कलमांतील पोटकलमान्वयें वरील व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क विनाचौकशी हिरावून घेण्यास पुष्कळ वाव आहे. तरीपण जो कांहीं मर्यादित ( Liberty of Person )









अनुक्रमणिका

वैयक्तिक सुरक्षितता हक्क म्हणून मान्य करण्यांत आला आहे तो या दृष्टीनें महत्त्वाचा वाटतो. राज्यकर्त्यांनीं नागरिकास योग्य न्याय देणें हा हक्क आतां सर्वत्र मान्य झाला आहे व त्या हक्काच्या बजावणीबद्दल कांटेकोर व्यवस्था सर्व राज्यघटनांतून दिसते. या हक्काची सरकार-विरुद्ध अंमलबजावणी करतां यावी म्हणून घटनेंत तजवीज केलेली असते. पण सोव्हिएट घटनेंत मात्र कलम १२७ मध्यें वरील उल्लेखाखेरीज स्पष्ट तरतूद दिसत नाहीं.

## आरोप म्हणजेच सिद्ध झालेले गुन्हे !

बेरिया-प्रकरणावरून व्यक्तीच्या हक्काच्या संरक्षणाबद्दल फारशी व्यवस्था असावी असें दिसत नाहीं. बेरियाला अटक झाल्याबरोबर प्रसिद्ध झालेल्या पत्रकांत बेरियानें पक्ष व देश यांविरुद्ध परकीय भांडवलदार हितसंबंधांचा हस्तक म्हणून कारवाया केल्या व पक्ष व राज्ययंत्रावर आपल्या खात्याची मात करण्याचा प्रयत्न केला असे आरोप करण्यांत आले. हे आरोप प्रसिद्ध झाल्याबरोबर त्यांची न्यायालयीन चौकशी होईल असें पण जाहीर झालें. आरोपाबरोबर मात्र बेरियाच्या गुन्ह्याबद्दल कडक शब्दांत टीकेचा भडिमार सुरूं झाला. कम्युनिस्ट पक्षाच्या अधिकृत मुखपत्रांत बेरियाच्या सर्व गुन्ह्यांची तपशील-वार यादी देण्यांत येऊन तो किती भयंकर देशद्रोही होता याचें सविस्तर वर्णन ( जाग-तिक साम्राज्यशाहीचा हस्तक, कम्युनिस्ट पक्ष व जनतेचा कट्टा नीच शत्रु वगैरे वगैरे ) देण्यांत आलें. भांडवलशाही राज्यव्यवस्थेंतील न्यायाचें सामान्य तत्त्व असें कीं, योग्य न्यायालयानें गुन्हेगार ठरविल्या-खेरीज कोणी गुन्हेगार ठरत नाहीं. कोणीहि गुन्हा सिद्ध होईपर्यंत निरपराध आहे. बेरिया प्रकरणावरून हा सिद्धांत सोव्हिएट व्यवस्थेंत मान्य दिसत नाहीं. ज्या पद्धतीनें व ज्या पद्धतीचा बेरियाविरुद्ध प्रचार सुरूं झाला त्यावरून बेरिया हा गुन्हे जाहीर झाल्या-बरोबर गुन्हेगार ठरला ! त्याच्यावर केलेल्या आरोपांना वस्तुस्थितीचें स्वरूप आलेलें दिसलें व अशा भडि-मारांतून त्याला न्याय मिळेल अशी शंकासुद्धां येऊं नये असा भडक प्रचार देशव्यापी स्वरूपांत दिसूं लागला भांडवलशाही राज्यघटनेंतील व्यक्तीला अशा प्रकारच्या अपप्रचाराविरुद्ध 'या प्रचारानें न्यायासनाचा अपमान होतो ' अशी तक्रार करून असा प्रचार न्याय मिळेपर्यंत बंद करतां येतो. इतकेंच नव्हें तर न्यायालय सुद्धां अशा प्रचाराची दखल घेऊन तो अपप्रचार बंद करूं शकतें. हें स्वातंत्र्य सोव्हिएट नागरिकाला उपलब्ध नाहीं असें दिसतें. हा प्रकार गंभीर आहे. कारण एकदां व्यक्तीवरील गुन्हा जाहीर झाला याचा अर्थ ती व्यक्ति गुन्हेगार ठरली, असा त्याचा अर्थ होतो. मग गुन्ह्याच्या स्वरूपाची न्यायालयीन चर्चा दुय्यम ठरते, कारण एकदां जाहीर झालेले आरोप म्हणजे केलेले गुन्हेच असें समीकरण झालें म्हणजे अटक झालेल्या व्यक्तीस न्याय कसा मिळणार ? त्याची बाजू घेण्यास वकील तरी कसे सरसावणार ? व्यक्ति गुन्हेगार आहे किंवा नाहीं हा प्रश्न न्यायालयांत ठरविण्यापूर्वीच जर गुन्हेगाराला दोषी म्हणून वाळींत टाकून देण्यांत आलें तर ? – या भडक प्रचारी पद्धतीनें व्यक्तीला न्याय मिळणें कठीण होतें यांत शंका नाहीं. सोव्हिएट नागरिकाला निःपक्षपाती चौकशीचें स्वातंत्र्य नाहीं असा या घटनेचा अर्थ लावावयाचा काय ? झेडनोव्हच्या खुनाबद्दल कांहीं डॉक्टरांना अटक होऊन त्यांचे कबुलीजबाबहि घेण्यांत आले होते; पुढें ते जबाब व सर्व आरोप खोटे होते व त्यांचे त्या बाबतींतले कबुलीजबाबहि अत्यंत आक्षेपार्ह पद्धतीनें घेण्यांत आलेले होते असें खुद्द सोव्हि-एट सरकारनें जाहीर केलें. अर्थात् ते डॉक्टर जर निरपराधी होते, तर ते निरपराधी आहेत व त्यांना न्याय मिळाला पाहिजे असें वाटणारे त्यांचे हितसंबंधी कोणीतरी असतीलच. परंतु त्यांच्यापैकीं कोणींहि अगर त्यांच्या नातेवाईकांनीं न्याय मिळविण्याची खटपट केलेली नव्हती. यावरून गुन्हा न केल्याची खात्री असूनहि अटक झालेल्या व्यक्तीच्या हक्कासाठीं कोणी हिरिरीनें पुढें येण्याची शक्यता सोव्हिएट समाजांत नसावी अशी शंका आल्यास तें स्वाभाविक नव्हे काय ? सरकारची बुद्धि जागृत झाल्यावरच न्याय मिळ-णार एरवी नाहीं असा त्याचा अर्थ नव्हे काय ?

## न्याय कीं न्यायाचा मुलामा ?

बेरियावर केलेल्या आरोपांचें स्वरूप अधिकारांचा दुरुपयोग करणें, नागरिकांवर व पक्षाच्या सभासदांवर जुलूम करून पक्षाच्या सभासदांचा खून घडवून आणणें, पक्ष व राजव्यवस्थेंत दडपशाही करणें अशा प्रकारचें आहे. अर्थात् हे सर्व गुन्हे एका व्यक्तीस करतां येणार नाहींत. अितर व्यक्तींच्या सहकार्यानेंच – मग






तें सहकार्य सहजस्फूर्त असो वा लादलेलें असो — अशा प्रकारचे गुन्हे करणें शक्य आहे. आतां बेरियाची चौकशी करतांना त्याच्याबरोबर ज्यांनीं सत्ता चालविली त्यांची पण चौकशी होणें जरूर होतें. पण प्रत्यक्ष पहावें तर बेरियाच्या चौकशींत त्याच्याबरोबरच सुप्रीम सोव्हि-एटच्या प्रिसिडियमचा कांहीं काळ अध्यक्ष असलेला एन्. एम्. शेव्हर्निक न्यायाधीशमंडळाचा अध्यक्ष म्हणून काम करीत होता. न्याय देणारी व्यक्तीच जर एके काळीं गुन्हेगाराशीं सहकार्य करणारी व्यक्ति असेल तर त्या न्यायाला फारसें महत्त्व येईल असें वाटत नाहीं. या सर्व न्यायदानाचा अर्थ अेकच असतो. जाहीर झालेले गुन्हे व त्यांचा न्याय यांचा निर्णय एकदमच होतो. जे गुन्हे जाहीर करतात त्यांनीं गुन्हेगाराविरुद्ध निर्णय घेतलेला असतो. चौकशी कर-णाऱ्या न्यायालयाचा या व्यवहारांत कांहीं संबंध नसतो. ही परिस्थिति व्यक्तिस्वातंत्र्याच्या महत्त्वाच्या दृष्टीनें भयावह आहे. कारण आरोपी व न्यायाधीश या दोहों-च्याहि कार्यांचा उरक एकच व्यक्ति वा संस्था यांच्या हातीं जातो आणि सरकारनें घेतलेल्या निर्णयाची अंमल-बजावणी करण्याचें काम म्हणजेच त्याला कायदेशीर न्यायाचा मुलामा देण्याचें कार्य न्यायालय करतें. आणि तें न्यायालय पण पक्षपाती असते. कारण बेरियाबरोबर सत्तेचा उपयोग करणारे, आपले गुन्हे अगर भागीदारी छपविण्यासाठीं कोर्टापुढें पुष्कळसा पुरावा येऊं न देण्याची सावधगिरी बाळगतील याची शक्यता तर आहेच पण त्याचबरोबर बनावट पुरावा पण पुढें येण्याचा संभव आहे.

### व्यक्तिस्वातंत्र्य हा जनतेचा वारसा आहे

वरील विवेचनाचा अर्थ असा नाहीं कीं भांडवल-शाही राजवटीखालील न्याय व व्यक्तिस्वातंत्र्य यांबद्दल प्रस्तुत लेखकाला खास आपलेपणा वाटतो. वर्गभेदावर आधारलेल्या समाजांत सामान्य व्यक्तीला न्याय व कायदा यांचा उपयोग नसतो ही गोष्ट मला मान्य आहे. राज्यघटनेंतील कलमें कागदावर राहतात व तीं शक्य तों प्रत्यक्षांत न यावीं असाच सारा कायदा व सुरक्षितता यांचा अर्थ निघतो. पण भांडवलशाही समाजव्यवस्थेंत अनेक शतकांच्या झगड्यांचा परिपाक म्हणून जे कांहीं मूलभूत हक्क सामान्य व्यक्तीनें मिळवि-लेले आहेत त्यांचा साम्यवादी व खऱ्या अर्थानें लोक-शाही व्यवहारांत अपहार होऊं नये याबद्दल जागरूकता दाखविणें जरूर आहे. सर्व नागरिकांना समान भूमिके-वरून न्याय मिळावा, गुन्हा निःपक्ष न्यायालयासमोर शाबीत ठरविल्याशिवाय व्यक्तीला गुन्हेगार समजून त्याचे सामान्य नागरिकत्वाचे हक्क हिरावून घेण्यांत येऊं नयेत अशा प्रकारचे हक्क आतां सर्व भांडवलदार समाजांतील राज्यघटनांत अन्तर्भूत झाले आहेत. नागरिक हा समाजाचा घटक असला तरी प्रत्यक्ष व्यवहारांत राज्यसत्ता व नागरिक यांच्यामध्यें विरोध उत्पन्न होण्याची शक्यता नेहमीं असते व ही अशी शक्यता असते म्हणूनच नागरिकांच्या मूलभूत हक्कांची हमी घटनेच्या द्वारा मिळावी अशी व्यवस्था केलेली असते. निदान तशी व्यवस्था असावयास हवी असा सर्व लोकशाहीवाद्यांचा आग्रह असतो. नागरिकांच्या पुष्कळशा हक्कांची जपणूक व ते हक्क प्रत्यक्ष व्यवहारांत उपभोगण्याची व्यवस्था यांसाठीं सोव्हिएट राज्य-घटनेंत तरतूद आहे, ही गोष्ट सत्य आहे. परंतु प्रश्न येतो तो हा कीं नागरिक-विरुद्ध-प्रस्थापित शासनसंस्था यांच्यामध्यें विरोध निर्माण होतो तेव्हां नागरिकाला निःपक्षपाती न्याय मिळावा अशी तरतूद मूलभूत हक्कांत आहे किंवा नाहीं ? व्यक्तिस्वातंत्र्याचे हे हक्क प्रदीर्घ लढ्यानंतर मिळाले आहेत. सरंजामशाही न्याय व कायदा यांविरुद्ध बंड करून सर्वांना समान लेख-णारा कायदा निर्माण करण्यासाठीं भांडवलदारवर्गानें निकडीचा लढा दिला आहे. अर्थात् या लढ्यांत भांडवलदारवर्गानें जनतेचा पाठिंबा घेतला होता व त्या पाठिंब्यावरच त्यानें सरंजामशाहीवर मात केली. अर्थात् या लढ्याचें फळ हें सर्वसामान्य जनतेचा वारसा आहे. तो वारसा साम्यवादी राज्यांत पुढें चाल-ला पाहिजे. त्याचें विसर्जन होतां कामा नये. भांडवली समाजांत या हक्काचें कागदी स्वरूप असतें. नव्या साम्यवादी समाजांत तो हक्क प्रत्यक्षांत येण्याबद्दल दक्षता दाखवावयास हवी. मूलभूत हक्काबद्दलचें न्यायदानशास्त्र साम्यवादी राजवटींत निरुपयोगी ठरूं नये. कारण मार्क्सवादी विचारांच्या दृष्टीनेंहि पाहिलें असतां जुनें शास्त्र टाकून नवें रचण्याची कल्पना त्यांना संमत नाहीं. जुना वारसा अधिक संपन्न व सारखा लाभेल अशी व्यवस्था करण्यासाठींच तर नवीन मार्क्सवादी समाजरचना जरूर आहे.

## मार्क्सवादाचें शास्त्र तरी काय सांगतें ?

प्रत्येक समाजव्यवस्थेंत नव्या शास्त्रांचा जन्म होत नाहीं. शास्त्रांचे नियम स्वयंसिद्ध असतात. त्या नियमांचें आकलन करून समाजधारणेस त्यांचा उपयोग करणें हाच शास्त्राभ्यासाचा उपयोग आहे. न्यायदानशास्त्रांतील परंपरा विशिष्ट तत्त्वानुसार चालत आलेली आहे व त्या शास्त्रांच्या नियमांचा वस्तुनिष्ठ पद्धतीनें अभ्यास करणें भाग आहे. म्हणून साम्यवादी व्यवस्थेंत नवें शास्त्र निर्माण करण्याचा अट्टाहास अशास्त्रीय ठरतो ! अर्थशास्त्राच्या प्रश्नावरील प्रबंधांत स्टॅलिननें समाजशास्त्रांशीं अशी दांडगाई करण्याविरुद्ध इशारा दिला आहे. अर्थशास्त्राच्या नियमाबद्दल स्टॅलिननें मांडलेले विचार न्यायशास्त्राच्या नियमासहि लागूं पडतात. स्टॅलिननें म्हटलें आहे : " अर्थशास्त्राच्या नियमांचा एक विशेष गुण असा आहे कीं, विज्ञान व तत्सम शास्त्राप्रमाणें हे नियम चिरकालीन स्वरूपाचे नसतात. निदान अर्थशास्त्राच्या बऱ्याच नियमांचा एका विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितींत वापर झाल्यानंतर त्यांची जागा नवे नियम घेतात. याचा अर्थ नियमांचा नाश होतो असें नाहीं तर नव्या आर्थिक परिस्थितींत पूर्वींच्या नियमांचें आसन नष्ट होतें व त्यांची जागा नवे नियम घेतात. पण हे नवे नियम मनुष्य आपल्या कल्पनेंतून निर्माण करीत नाहीं. तर ते नव्या वास्तवाच्या आधारावर तयार होतात.' – (स्टॅलिन : 'अर्थशास्त्राचे प्रश्न' पृ. ७) हाच विचार न्यायदानशास्त्राला लागूं केला तर जुनें न्यायदानशास्त्र साफ करून टाकण्याची कल्पना शौर्याची वाटली तरी मार्क्सवादी ठरत नाहीं.

## रशियांतील नवी लाट ?

वरील विवेचनाचा हेतु एवढाच आहे कीं पक्षनिष्ठा म्हणून रशियांत झालेल्या गंभीर घटनांकडे जाणून-बुजून दुर्लक्ष होऊं नये. एखाद्या वा अनेक व्यक्तींच्या नाशापेक्षां एका मोठ्या तत्त्वास हरताळ फांसला जात आहे या गोष्टींची चर्चा व्हावी असा या लेखाचा उद्देश आहे. रशियांत या प्रश्नास कांहींतरी तोंड फुटलें असावें, असा तर्क बेरियाच्या शिक्षेनंतर लगेच कांहीं दिवसांनीं प्रसिद्ध झालेल्या बातमीवरून काढतां येईल. या बातमीप्रमाणें नागरिकांना योग्य पुराव्याशिवाय अकारण अटक करण्यांत येऊं नये, अशी सूचना अधिकाऱ्यांनीं दिलेली आहे. याशिवाय नागरिकजीवनाच्या सर्व क्षेत्रांत टीकेची एक नवीन लाट सध्या रशियांत उसळलेली आहे, असें प्रसिद्ध होत असलेल्या सोव्हिएट पत्रांतील व इतर लेखांवरून दिसून येतें. पुस्तकप्रसिद्धीपासून, विक्री, मानसशास्त्र, संगीत, नाट्य, लेखनव्यवसाय इत्यादि विविध क्षेत्रांतील स्वातंत्र्याच्या प्रश्नाबद्दल कडाक्याचे वाद सर्वत्र सुरू असल्याचें सोव्हिएट वृत्तपत्रांतून दिसून येतें. अर्थात् नागरिकस्वातंत्र्याच्या दृष्टीनें ही घटना स्वागतार्ह आहे. मात्र टीकेची ही लाट राजकर्त्यांच्या कृपेवरच व सौजन्यावर अवलंबून असूं नये. तो एक व्यक्तीचा हक्क अशा स्वरूपांत ती असली तरच ती स्वागतार्ह मानतां येईल.

महत्त्वाचा प्रश्न एवढाच आहे कीं, समाजाचा मूलघटक जो नागरिक त्याच्या दृष्टीनें व्यक्ति व समाज यांत नैसर्गिक द्वंद्व असण्याचें कारण नाहीं ही गोष्ट साम्यवादी सत्ता कोणत्या पद्धतीनें पटवून देणार ? आतांपर्यंतचा इतिहास असा आहे कीं, व्यक्तीला स्वतःच्या विकासासाठीं एकूण समाजाची चौकट व इतर विरोधी वा स्पर्धा करणाऱ्या व्यक्ती यांच्याशीं झगडा द्यावा लागतो. साम्यवादी व्यवस्थेंत व्यक्तिविकासाचीं हीं बाह्य दडपणें आपोआप दूर होतात. पण नव्या साम्यवादी व्यवस्थेंत धाकदडपशाहीच्या मार्गानें व्यक्तीला जुन्या संस्कारापासून परावृत्त करून आपण तिच्यावर नवीं मूल्यें बिंबविणार कीं तिला तीं न समजल्यास तीं सामोपचारानें पटवून देण्याचें कार्य नवी साम्यवादी समाजरचना करणार हाच मूलभूत प्रश्न आहे. नागरिकांना नव्या समाजरचनेंतील मूल्यांचा प्रत्यय येण्यास थोडा अवधि लागणें साहजिक आहे. शिवाय शिक्षणाच्या या काळांत सामान्य नागरिकावर विश्वास टाकणें जरूरहि आहे. त्याला साध्या चुकीबद्दल देशविरोधी असा शिक्का मारून समाजांतून उठविण्याचा प्रयत्न फारसा समंजसपणाचा ठरणार नाहीं. युद्धासारख्या आणीबाणीच्या प्रसंगापुरते अपवाद सोडल्यास नागरिकाला समाजवादी रचनेंतील नव्या मूल्यांबद्दल सामोपचारानें शिक्षण देण्यांत यावें याबद्दल दुमत असूं नये असें वाटतें. याचाच अर्थ असा कीं साम्यवादी समाजव्यवस्थेंत नागरिकाच्या प्रत्येक प्रमादाचा राजकीय अर्थ न लावतां त्याला पूर्ण निःपक्षपाती चौकशी झाल्याखेरीज कडक शासन करण्यांत येऊं नये.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



श्री. भा. रं. कुळकर्णी

# पुरुषनिरपेक्ष स्त्रीजीवनाचा संभाव्य आदर्श

स्त्रीजीवनाचा विविध दृष्टिकोणांतून विचार होऊन त्याबद्दल लेखकांच्या मतांप्रमाणें परस्परविरुद्ध सिद्धान्त प्रतिपादले जात आहेत. प्रस्तुत लेखांत मानवी जीवनाच्या इतिहासाचा मागोवा घेत व पुढेहि मानवजात नष्ट न होईल अशा दृष्टीनें विचार करून अधिकांत अधिक पुरुषनिरपेक्ष स्त्रीजीवनाला वाव देणारा आदर्श समाज कसा संभवू शकेल त्याचें किंचित् दर्शन घडविण्याचा प्रयत्न करीत आहे.

### ऐतिहासिक दृष्टि

महाराष्ट्रांत सांप्रत पितृप्रधान कुटुंबव्यवस्था चालू आहे. पण महाराष्ट्र किंवा भारत म्हणजेच मानवजातीचें महत्त्वाचें किंवा प्रलोभनीय स्थान नव्हे. तसेंच या प्रदेशांतील स्त्रीपुरुषसंबंधाचें प्रचलित स्वरूप म्हणजे यच्चयावत् मानवजातीला आदर्श स्वरूपहि नव्हे !

इतिहास असा निर्वाळा देतो कीं स्त्रीपुरुषसंबंधाचा सांचा हा स्थलकालप्राप्त परिस्थितीनुरूप सतत बदलत आला आहे, बदलत आहे व पुढें बदलणार. भावना व उपयुक्तता या दृष्टीनें एकवाक्यता होणें सतत व सर्वत्र शक्य नसतें. प्रथम उपयुक्ततेनें सिद्ध झालेला सांचा पुढें सवयीनें परिचित, प्रिय आणि आदर्श ठरतो, भावनेचा विषय होतो व बदलणाऱ्या परिस्थितीशीं बराच वेळ टक्कर देत टिकवला जातो. उपयुक्ततेला भावनेचें फळ येणें हा नियम. पण भावनेचा बदललेला विषय बदलल्या जगांत सर्वत्र सर्वकाळीं उपयुक्त राहू शकत नाहीं. यामुळें प्राचीन उपयुक्ततेनें जन्म दिलेल्या भावनाविषयावर बदलल्या उपयुक्ततेचा सतत हल्ला होत असतो. याचेंच नांव ऐतिहासिक दृष्टि, परिवर्तनवाद, बुद्धिवादी दृष्टिकोण इत्यादि.

### स्त्रीप्रधान कुटुंबसंस्थेची जोड

आपल्या समाजांत आज स्त्रियांना संपूर्ण ५० टक्केहि हक्क मिळालेले नाहींत. सरकारी कागदोपत्रीं पितृत्वाची नोंद जननाच्या बाबतींत प्रबळ आहे. मातृत्वाचा उल्लेख कचऱ्याच्या किंमतीनेंहि जोखला जात नाहीं. तसेंच वारसा व वधव्य या बाबतींत नवेनवे कायदे पुढे येत आहेत तरी पुरुषाचे अधिकार व्यापकच आहत.

आज पुरुषास नैसर्गिक शारीरिक गरज भागविण्यापुरताच विचार करावयाचा तर विवाह आवश्यक वाटणार नाहीं. संततीसाठीं सुद्धां विवाह आवश्यक नाहीं. कोणाहि स्त्रीशीं विवाहबाह्य संबंध ठेवून झालेल्या संततीच्या पितृत्वाच्या जागीं आपली नोंद केली कीं पुरें. विवाहांतर्गत संततीच फक्त हवी व विवाहित बायकोचें लोढणें नको असेल तर मूल झाल्यावर तें हिसकावून घेऊन तिला पोटगी देऊन तें सरळ दूर लोटतां येतें.

पुरुषांना स्त्रीवांचून जन्म काढतां येतो. स्त्रियाहि पुरुषावांचून जन्म काढूं शकतात. पण मानवजातीचें सातत्य टिकविण्याचा नैसर्गिक प्रवाह खंडित न होऊं देतां, पुरुषाला स्त्रीनिरपेक्ष जन्म घालवावयाचा तर त्यानें त्याच्या परिस्थितीला साधेल असा संततीपुरता कोणत्याहि स्त्रीशी विवाह करून किंवा विवाहावांचून संबंध ठेवला म्हणजे पुरतें.

अगदीं हेंच उत्तर स्त्रीच्या बाबतींतहि देता येईल. आज उपजीविकेच्या दृष्टीनें अनेक स्त्रिया स्वावलंबी आहेत व होतील. प्रचलित समाजांत मातृत्व हें पतिनिरपेक्ष असल्यास निंद्य व पतिसापेक्ष असल्यास परावलंबन निर्माण करणारेंच आहे म्हणून स्वातंत्र्य कीं मातृत्व असा निवडीचा पेचप्रसंग येतो. त्यावर सहज साधी तोड आहे. ती ही कीं सांप्रत समाजांत जी पुरुषप्रधान कुटुंबव्यवस्था आहे, तिच्याच जोडीला स्त्रीप्रधान कुटुंबव्यवस्था वैध उपायांनीं उपलब्ध करावी म्हणजे विवाहविषयक सर्व पेचप्रसंगावर त्यामुळें तोड राहील.

जन्मलेल्या मुलांच्या जननोंदींत पित्याच्या ऐवजीं मातेचें नांव देणें पुरेसें समजावें. तिच्या संपत्तीच्या वारसाप्रकरणीं ती नोंद विवाहांतर्गत संतति कीं विवाहबाह्य संतति असा प्रश्न उपस्थित न करतां विचारांत घेतली जावी. कमवत्या स्त्रियांना झालेल्या मुलांच्या जननोंदी मातेच्या नांवावरच करावयाच्या अटीवर लग्न करतां यावें व अशा लग्नानंतर तिचें व तिच्या जोडीदार पुरुषाचें न पटलें तर तो कमावता नसल्यास फार तर त्याला कांहीं पोटगी देऊन, टाकून घालतां यावें. संतति आईजवळ राहावी व कमवत्या स्त्रियांना मातृत्वासाठीं विवाहाची आवश्यकता नसावी हें वरील पहिल्या कलमावरून कळेलच.








### अकुलीनत्वाकडे कानाडोळा !

सामाजिक कुलीनत्व म्हणजे विवाहांतर्गत संततीची परंपरा. त्यांत वैभवाची भर पडली तर उत्तमच. पण मनुष्य आपणच सोयीचीं बंधनें निर्माण करून त्यांना 'शास्त्र' नांव देतो व त्यांत अडकून अगतिक होण्याइतका निर्बुद्ध नसतो. अनेक राजघराणीं पृथ्वीच्या पाठीवर अशीं आहेत कीं ज्यांत उपर्युक्त कुलीनत्वाचा दंडक खंडित झाल्याचे भरपूर दाखले आहेत. पण त्यांचा सामाजिक दर्जा ढासळला नाहीं. चालू काळांत व्यक्तिस्वातंत्र्य व विद्या, व्यवसाय आणि द्रव्यार्जन यांत विवाहबाह्य जन्म आड येऊं शकत नाहीं आणि अशी संतति जेव्हां समाजांत पैसा, विद्वत्ता, अधिकार यापैकीं एक किंवा अनेक प्रकारें चमकते तेव्हां त्या व्यक्तीच्या अकुलीनत्वाकडे सोईस्कर कानाडोळा सामाजिक जीवनांत होतो.

पुरुषप्रधान कुटुंबव्यवस्था असतांहि ही स्थिति. स्त्रीप्रधान कुटुंब झालें तर याच्यापलीकडे कांहीं रेसभरहि अधिक-उणें होणार नाहीं. मात्र कांहीं काळ चुकल्या-चुकल्यासारखें वाटेल येवढेंच.

पुरुषप्रधान कुटुंब-समाजांत स्त्रियांचा वेश्या-व्यवसाय, टाकून घातलेल्या स्त्रिया, अंगरक्षा असा स्त्रियांचा अल्पसा वर्ग जागोजागी दिसतो. अगदीं हच उलटें दृश्य स्त्रीप्रधान कुटुंबव्यवस्था फोफावली तर अधिक स्पष्ट दिसेल : म्हणजे पुरुषवेश्या, टाकून घातलेले पुरुष, अंगरक्षक पुरुष असा विवाहित पुरुषांव्यतिरिक्त कांहीं पुरुषवर्ग जरा ठळकपणें आढळेल इतकेंच. वस्तुतः अशा व्यक्ती आजहि समाजांत तुरळक असतातच.

### दोन कुटुंबपद्धतींचा समन्वय

जर या दोन पुरुषप्रधान व स्त्रीप्रधान कुटुंबपद्धतींचा समन्वय साधतां आला तर स्त्रीपुरुषांच्या सर्व गैरसोयी लुप्त होऊन हव्या त्या सोयी उपलब्ध होतील. तो समन्वय असा : स्त्री अथवा पुरुषानें कर्ते होतांच कोणती कुटुंबपद्धति चालू ठेवावयाची हें ठरविण्यास मुखत्यार असावें व तें ठरवून मग त्याप्रमाणें नंतर विवाह करून कुटुंबाचा श्रीगणेशा करावा. यांत स्त्रीवर्गाच्या आज भासणाऱ्या सर्व अडचणींचा निरास होऊं शकेल. नटी, प्रोफेसर, डॉक्टर, अधिकारी अशा स्त्रियांना विवाह न करतां हवी तेवढी मातृत्वाची तहान भागवतां येईल. त्यांच्या आर्थिक सुस्थितीमुळें होणाऱ्या प्रजेच्या भविष्याची ददात रहाणार नाहीं. टेस्ट ट्यूब बेबीज आतां रांगूं लागल्या आहेत. ज्या स्त्रिया सांपत्तिक दृष्ट्या समर्थ आहेत त्यांना आर्थिक दृष्ट्या त्यांवर अवलंबून राहूं शकतील अशा सुंदर तरुणाची निवड करण्याची भरपूर सवड निर्माण होईल. सदर तरुणांत शारीरिक आकर्षण ही डोळयांत भरण्यासारखी गोष्ट राहील व शिक्षण वगैरे या काणाडोळा करण्याच्या बाबी होतील. एकदोन भावंडांचें शिक्षण करणारी कमवती तरुणी त्या भावंडाइतकाच भाबडा, अजाण पण मनासारखा सुंदर नवरा आपल्या कुटुंबांत सुखानें वागवूं शकेल व वैवाहिक स्वास्थ्य, सौख्य मनमुराद लुटून मातृत्वाला वाव देऊं शकेल.

### इष्टींची भावनांची गळचेपी

अशा या स्त्रीप्रधान कुटुंबपर्यायाचा आजच्या आपल्या समाजांत अभाव असल्यानें अनेक विद्वान् कमवत्या स्त्रियांना तसाच विद्वान् व कमवता नवरा न लाभल्यामुळें आपल्यापेक्षां खालच्या पातळीचा पुरुष पति म्हणून पत्करणें कमीपणाचें वाटतें व म्हणून त्यांना निसर्गदत्त भावना व वासनांची गळचेपी करून कुमारी म्हणून जन्म काढावा लागतो. तर उलट एखादा मंत्री, गव्हर्नर यासारखें पद भूषविणारा, विद्वत्तेच्या बाबतींत विजोड, पेशा किंवा सामाजिक दर्जानें सामान्य अशा स्त्रीशीं तिचें प्रमुखतः सौंदर्य व त्या बरोबर घर चालविण्याची पात्रता पाहून विवाह करतो. त्यांत त्याला, तिला व समाजाला किंचित्हि वैगुण्य वाटत नाहीं व वाटूंहि नये. तेंच नेमकें स्त्रियांनीं मनोधैर्यानें करावयास पाहिजे. असें होऊं लागण्यानें सर्वांची सोय होईल व उपयुक्त प्रकारें मानवी जीवनांतील ऐहिक सुखांपैकीं ब्रह्मानंदाशीं लक्षणेनें तुल्य ठरलेल्या शृंगारसुखाला व त्यावर फुलणाऱ्या वात्सल्यादि भावनांना अशा स्त्रिया आंचवणार नाहींत. तसेंच कमवत्या स्त्रियांना आपल्याला पसंत वैध पेशांत व अर्जित धनाच्या हव्या तशा विनियोगांत पतीची अडगळ किंवा अडथळा न वाटता तक्रारीला जागा राहणार नाहीं.

समाजाचें लक्ष आतांपावेतों अधिकांश वर्गविषमता नाहींशी करण्याकडे केंद्रित होतें. वर्गसमता दृष्टिपथांत येऊं लागल्यावर लैंगिक समता हा पुढचा लढ्याचा विषय व्हावयाचा आहे. याचीं पूर्वचिन्हेंच म्हणजे या विषयावरचे विवाद होत असें दिसतें.








डॉ. दि. धों. कर्वे

# संयोगीकरणाची किमया

किमया ह्या शब्दांत जादुगिरी असा थोडासा अर्थ आहे. लोखंडापासून किंवा दुसऱ्या एखाद्या हीन धातूपासून सोनें तयार करणें ह्याला आपण किमया म्हणतों. पाश्चात्त्य देशांतहि पूर्वी किमया करण्याकरतां परीस शोधून काढण्याची धडपड बऱ्याच लोकांनीं केली पण तिला अर्थातच यश आलें नाहीं. त्यांच्या प्रयोगांना 'आल्केमी' हें नांव पडलें व पुढें रसायनशास्त्रालाहि पाश्चात्त्य भाषांत केमिस्ट्री, शेमी, किमी अशीं नांवें मिळालीं. ह्या सर्वांमधील मूळ धातु व किमया ह्या शब्दामधील मूळ धातु एकच आहे. किमयेमध्यें एका द्रव्यापासून दुसरें द्रव्य तयार करावयाचें ही जी मूळ कल्पना तिचाच आज जरा निराळ्या बाजूनें आपल्याला विचार करावयाचा आहे. रासायनिक संयोगीकरणांत असें रूपांतर नेहेमीं घडतें व ज्या द्रव्यांचा संयोग होतो त्यांच्या रूपांत व गुणांत आणि जें द्रव्य तयार होतें त्याच्या रूपांत व गुणांत जमीनअस्मानाचें अंतर पडतें. काळाकुट्ट कोळसा आणि अदृश्य असे हैड्रोजन-ऑक्सिजन हे वायू ह्यांच्या संयोगीकरणानें प्लॅस्टिक बनवणें ही किमयाच नाहीं का ? — पण ही किमया साध्य होण्यास हजारों शास्त्रज्ञांचें अनेक वर्षांचें संशोधन कारणीभूत झालेलें आहे हें आपण ध्यानांत घेतलें पाहिजे.

शास्त्रांचें व इतर विषयांसंबंधींचें संशोधन कां करावें याचें उत्तर दोन प्रकारचें दिलें जातें. केवळ ज्ञानप्राप्ति व तिच्यापासून मिळणारा आनंद ह्याकरतां संशोधन करावें असें म्हणणारा एक पक्ष आहे, तर ह्याच्या उलट प्रत्येक प्रकारच्या संशोधनापासून मनुष्याचा कांहीं ना कांहीं फायदा झाला पाहिजे, त्याचें जीवन जास्त सोईचें, सुखाचें झालें पाहिजे, असेंहि म्हणणारा एक पक्ष आहे. उद्देश कांहींहि असो, शास्त्रीय संशोधन सर्व पुढारलेल्या देशांत फार मोठ्या प्रमाणावर चालू आहे यांत मात्र संशय नाहीं. विशेषतः रसायनशास्त्र हें तर शास्त्र असें आहे कीं केवळ ज्ञानप्राप्तीकरतां केलेल्या अगदीं तात्त्विक अशा संशोधनापासूनहि मनुष्याच्या उपयोगीं पडणारे असे हजारों नवे संयोग तयार झालेले आहेत. ह्या सगळ्यांची नुसती यादी द्यायचें म्हटलें तरी तें अशक्य आहे. मी आज फक्त कांहीं थोड्या संयोगांचाच उल्लेख करणारा आहें.

रासायनिक संयोगीकरणाचा विचार मुख्यत्वें दोन दृष्टींनीं करतां येईल. सृष्टींत जीं निरनिराळीं द्रव्यें उपलब्ध होतात तीं विशिष्ट परिस्थितींत अगर विशिष्ट देशांत दुर्मिळ झालीं तर विपुल मिळणाऱ्या कच्च्या मालापासून कृत्रिम रीतीनें तींच द्रव्यें तयार करणें हा संयोगीकरणाचा एक प्रकार आहे. पण त्याहिपेक्षां महत्त्वाचा प्रकार म्हणजे पूर्वी ज्यांची माहितीसुद्धां नव्हती अशा प्रकारचीं नवीनच द्रव्यें तयार करून त्यांचा विशिष्ट कामाकरतां उपयोग करणें. आजच्या भाषणांत ह्या दोन्ही प्रकारच्या संयोगीकरणाची माहिती येईलच.

सुमारें शंभर-दीडशें वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत **निळीचा** धंदा फार भरभराटींत होता व निळीची लागवड मोठ्या प्रमाणावर होई. निळीचीं रोपटीं वाढलीं म्हणजे कापून तीं पाण्यांत भिजत घालीत व कुजल्यामुळें त्यांतून नीळ बाहेर पडली म्हणजे ती वेगळी करून वाळवीत. अशा रीतीनें तयार झालेली नीळ पृथ्वीवरील

---

प्रस्तुत भाषण डॉ. दि. धों. कर्वे यांनीं पुणें रेडिओवरून केलें. तें येथें पुणें रेडिओ अधिकाऱ्यांच्या परवानगीनें प्रसिद्ध केलें आहे.— शास्त्रीय विषयाचें देशभाषांतून विवेचन करतांना शास्त्रीय परिभाषा कोणती वापरावी हा प्रश्न हल्लीं विचारवंतांना व्यग्र करीत आहे. डॉ. रघुवीरांची संस्कृतोद्भव शास्त्रीय परिभाषा विद्वानांपुढें असून तिच्या द्वारें केलेलें शास्त्रीय विषयाचें विवेचन वाचकांना किती सुगम होऊं शकेल याविषयीं अत्यंत तीव्र मतभेद आहेत.— पारिभाषिक शब्दांचें स्तोम न माजवितां, शास्त्रीय विषयाचें केलेलें विवेचन किती सुगम होऊं शकतें याचा पडताळा वाचकांस डॉ. कर्वे यांच्या प्रस्तुत भाषणावरून पहातां येईल— का. सं.









अनुक्रमणिका

अनेक देशांत पाठवली जाई. हिंदुस्थानला निळीच्या धंद्याची मक्तेदारीच होती असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.—कोणतेंहि द्रव्य प्रयोगशाळेंत कृत्रिम तयार करावयाचें म्हणजे प्रथम त्याचें पृथक्करण करून त्या द्रव्याची घटना ठरवावी लागते. त्याच्या अणूंत कोणत्या मूलतत्त्वाचे किती परमाणू आहेत व त्यांची मांडणी कशी आहे हें निरनिराळ्या प्रयोगांनीं ठरवावें लागतें. निळीसंबंधाचें हें काम जर्मनींत मुख्यत्वें **बायर** ह्यांनीं केलें व पुढें त्यांनींच दगडी कोळशाच्या डांबरांत सांपडणाऱ्या नॅफ्थॅलीनपासून कृत्रिम नीळ तयार केली. ह्या नॅफ्थॅलीनचाच उपयोग आपण डांबराच्या **गोळ्या** ह्या नांवाखालीं कपड्यांना कसर लागूं नये म्हणून करतों. **प्रो. बायर** ह्यांच्या पद्धतींत नॅफ्थॅलीनपासून प्रथम थॅलिक आम्ल तयार करावें लागतें व पुष्कळ दिवस त्यांना ह्या कृतींत पुरेसें यश मिळत नव्हतें. एके दिवशीं त्यांच्या एका प्रयोगांत एक थर्मामीटर फुटला व त्यांतला थोडा पारा नॅफ्थॅलीन-मिश्रणांत गेला दुसरा एकादा संशोधक असता तर त्यानें हें मिश्रण फेकून दिलें असतें, पण **प्रो. बायरनीं** ह्या प्रयोगाचेंहि काळजीपूर्वक परीक्षण केलें. त्यांना असें आढळून आलें कीं तो प्रयोग कल्पनेबाहेर यशस्वी झाला होता व त्यांत थॅलिक आम्लाचें प्रमाण खूपच वाढलें होतें. ह्याचें कारण असें होतें कीं ह्या प्रयोगांत पाऱ्याचा " साहाय्यक " म्हणून उपयोग झाला होता. रासायनिक संयोगीकरणांत अशा अनेक द्रव्यांचा साहाय्यक म्हणून सर्रहा उपयोग केला जातो. अर्थात् मोठ्या प्रमाणावर थॅलिक आम्ल बनवितांनाहि पारा वापरूं लागले व कमी खर्चांत निळीचें उत्पादन यशस्वी झालें. त्यामुळें हिंदुस्थानांतील निळीचा धंदा जवळजवळ पूर्णपणें बसला. संयोगीकरणाच्या अगदीं पहिल्या पहिल्या यशाचा तडाखा अशा रीतीनें आपल्या देशालाच मिळाला !

**कापराची** गोष्टहि अशीच झाली. जपान व त्याच्या आसपासचे देश यांना कापराची मक्तेदारी होती. पण पाश्चात्त्य शास्त्रज्ञांनीं प्रथम कापराची रासायनिक घटना ठरवली व मग अनेक निरनिराळे प्रयोग करून दगडी कोळसा व खनिज तेल ह्या यूरोप-अमेरिकेंत विपुल मिळणाऱ्या कच्च्या मालापासून कृत्रिम कापूर तयार केला. तसेंच निळीप्रमाणेंच रंग म्हणून उपयोगांत येणाऱ्या **मंजिष्ठाचीहि** उत्पत्ति आतां फक्त कारखान्यांत होत आहे. **मंजिष्ठाला** इंग्रजींत 'ॲलिझरीन' म्हणतात व चिटें छापण्यांत त्याचा उपयोग होतो.

पूर्वीं विणकामांत वापरल्या जाणाऱ्या सूत, रेशीम, लोकर अशा धाग्यांना रंग देण्याकरतां फक्त वनस्पति-जन्य **रंगद्रव्यांचाच** मुख्यत्वें उपयोग होई. लवकरच पाश्चात्त्य रसायनशास्त्रज्ञांनीं ह्या सर्व रंगांचें उच्चाटण केलें; एवढेंच नव्हें तर शेकडों, हजारों नवीं रंगद्रव्यें बनविलीं. हीं सर्व रंगद्रव्यें कोळशाच्या डांबरांत सांपडणाऱ्या बेंझीन, टोलुईन, नॅफ्थॅलीन, ॲंथ्रॅसीन इत्यादि द्रव्यांपासून निरनिराळ्या रासायनिक क्रियांच्या मदतीनें बनवतात. एकदां एकाद्या विशिष्ट रासायनिक क्रियेनें रंगद्रव्य तयार होतें असें कळून आलें कीं मग तीच क्रिया अनेक निरनिराळ्या द्रव्यांवर करून, वेगळ्या वेगळ्या छटांचे रंग तयार करतां येतात. साबणाच्या पाण्याची धुलाई, ऊन, हवा वगैरेंमुळें अनेक दिवस न विटणारे असे कितीतरी रंग निरनिराळ्या प्रकारच्या वस्त्रप्रावरणांकरतां आज उपलब्ध आहेत. स्त्रियांच्या विणकामांत लागणाऱ्या दोऱ्यांच्या रंगांचा नकाशा ज्यानें पाहिला असेल त्याला कृत्रिम रंगाच्या विविधते-बद्दल जास्त कांहीं सांगावयास नको.

मनुष्याला थंडीवाऱ्यापासून संरक्षणाकरतां जसें वस्त्र-प्रावरण पाहिजे तसेंच शरीरस्वास्थ्यहि पाहिजे. त्याकरितां ज्या **औषधांची** त्याला गरज लागते तींहि बहुतेक सगळीं संयोगीकरणाच्या मदतीनें तयार केलेलीं असतात. नवीन **औषधांची** निर्मिति करतांना संशोधकांना अनेक निरनिराळ्या मार्गांचा अवलंब करावा लागतो. कांहीं वेळां जुन्या वैद्यकांत ज्या झाडपाल्याचा अगर खोड-मुळांचा विशिष्ट रोगांवर उपयोग केला जात असे त्यांपासून ह्या संशोधनाला सुरुवात होई. उदाहरणार्थ, अडुळसा किंवा ज्येष्ठमध यांचा खोकल्यावर किंवा काढे-चिराइताचा तापावर औषध म्हणून उपयोग होत असल्यामुळें त्या त्या पदार्थांचें पृथक्करण करून त्यांतील खरें क्रियावान् द्रव्य कोंणतें तें वेगळें करणें ही पहिली पायरी. मग त्या द्रव्याची रासायनिक घटना ठरविणें ही दुसरी पायरी. अखेरीस त्या द्रव्याचें प्रयोगशाळेंत संश्लेषण करणें ( म्हणजेच तें कृत्रिम रीत्या तयार करणें ) ही तिसरी पायरी. अशा रीतीनें कोकेन, ॲट्रोपीन, ओव्यांतील थायमॉल, अफूंतील मॉर्फिन इत्यादि अनेक










अनुक्रमणिका

औषधांवर संशोधन होऊन त्यांची रासायनिक घटना ठरविण्यांत आली; एवढेंच नव्हे तर त्यांतील बरींच औषधें प्रयोगशाळेंत किंवा मोठ्या प्रमाणांवर कृत्रिम रीतीनें तयार होऊं लागलीं.

पण संशोधकांचें समाधान केवळ सृष्टीची नक्कल करून होण्यासारखें नव्हतें. त्यांची महत्त्वाकांक्षा सृष्टीवर मात करण्याची होती आणि रसायन व वैद्यक ह्या दोन शास्त्रांच्या सहकार्यानें तीहि गोष्ट साध्य झाली. विशिष्ट प्रकारचें औषध जेव्हां शरीरांतील व्याधीच्या निराकरणाकरतां वापरलें जातें तेव्हां पुष्कळदां शरिरावर त्याचे कांहीं दुष्परिणामहि झाल्याचें दिसून येतें. उदाहरणार्थ, शरिराचा विशिष्ट भाग बधिर करण्याकरतां जें कोकेन नांवाचें औषध वापरतात तें बरेंच विषारी आहे व कांहीं थोड्या प्रमाणांत शरिराला त्यामुळें इजा होते. इतर अनेक औषधांचेंहि तसेंच आहे. औषधाचा जो विशिष्ट उपयोग तो मात्र तसाच रहावा, किंबहुना त्यांत सुधारणा व्हावी, पण त्यांपासून होणारी इजा अगर हानि मात्र नाहींशी व्हावी म्हणून त्या औषधाच्या रासायनिक घटनेंत निरनिराळ्या प्रकारचे बदल करून, नवे नवे संयोग तयार करून त्यांचा उपयोग प्राण्यांवर कसा काय होतो हें पहाण्यांत येतें. प्राण्यांवरचे प्रयोग यशस्वी झाले म्हणजे मग मनुष्यावरहि त्या औषधाचा उपयोग केला जातो. अशा रीतीनें कोकेनसारखींच पण त्याहून निरुपद्रवी व अधिक उपयुक्त अशीं नोव्होकेन, प्रोकेन अशा प्रकारचीं औषधें बनविण्यांत आलीं व हल्लीं तींच बहुधा वापरलीं जातात.

कृत्रिम औषधांत एक अति महत्त्वाचा वर्ग म्हणजे **जंतुनाशक औषधांचा**. त्यांतहि दोन प्रकार आहेत. शरिरांत जेव्हां रोगाच्या जंतूंचा संहार करावयाचा असेल तेव्हां त्या औषधानें शरिराला इजा न होतां फक्त रोगजंतूंचा नाश होईल अशींच औषधें वापरावीं लागतात. ह्याच्या उलट उपकरणें, बाह्यत्वचा इत्यादींवरील जंतूंचा नाश करतांना पुष्कळच अधिक तीव्र औषधें वापरतां येतात. शरिराच्या नाजूक भागांना इजा पोंचणार नाहीं किंवा पोंचलीच तर ती अगदीं थोडी पोंचेल पण शरीरांतील रोगाचें बीज असे जे जीवाणू ते मात्र नाश पावतील अशीं औषधें शोधून काढणें हें काम अति कठीण आहे. ह्याबद्दलचें एक उदाहरण सांगण्यासारखें आहे. गरमीच्या जंतूवर आर्सेनिकच्या संयोगांचा चांगला उपयोग होतो. पण आर्सेनिक म्हणजे सोमल हें मनुष्यालाहि विषारी असल्यामुळें, आर्सेनिकचे शेकडों निरनिराळे संयोग तयार करून त्यांची क्रिया प्रथम कांचेच्या नळींत व नंतर प्राण्यांना टोंची देऊन तपासण्यांत आली. अखेर साल्व्हर्सान नांवाचें औषध **एर्लिश्** ह्या शास्त्रज्ञानें शोधून काढलें. एर्लिश्ला औषधी रसायनाचा मूळ प्रवर्तक समजण्यांत येतें. पुढें साल्व्हर्सानपेक्षांहि परिणामकारक असें निओसाल्व्हर्सान हें औषध तयार करण्यांत आलें. जंतुनाशक औषधांत सल्फा औषधें, निद्रारोगावरील ॲटॉक्सिल, काला आझारवरील ॲंटिमनीचे संयोग इत्यादींचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. झोप आणणारीं, वेदना कमी करणारीं, गुंगी आणणारीं, त्याचप्रमाणें हिंवतापावरील प्लॅस्मोक्वीन, ॲटेब्रिन, मॅपॅक्रीन, पॅलुड्रीन इत्यादि औषधें आज डॉक्टर वापरीत आहेत व तीं सर्व रसायनशास्त्रज्ञांच्या संशोधनाचेंच फळ आहेत. तसेंच निरनिराळ्या प्रकारच्या सूक्ष्म जीवांपासून पेनिसिलीन, स्ट्रेप्टोमायसीन, क्लोरोमायसेटीन, ऑरोमायसीन इत्यादि औषधें गेल्या कांहीं वर्षांत मोठ्या प्रमाणावर प्रचारांत आलीं आहेत. त्यांच्या निर्मितींतहि रसायनशास्त्राची फार महत्त्वाची कामगिरी आहे.

सृष्टींत सांपडणाऱ्या खनिज तेलापासून तयार होणारें पेट्रोल, घासलेट, वंगणाचें तेल वगैरे पदार्थ सध्यांच्या यांत्रिक युगांत फार मोठ्या प्रमाणावर वापरले जातात. पण खनिज तेलाचे सांठे कांहीं विशिष्ट देशांतच सांपडतात व तेथेंहि तें पुष्कळदां पुरेशा प्रमाणांत उपलब्ध होत नाहीं. ह्याकरितां कोळशाची पूड व हैड्रोजन ह्यांचा सयोग करून **कृत्रिम पेट्रोल** वगैरे तयार करण्याची पद्धति आतां यशस्वी रीतीनें वापरतां येईल असें सिद्ध झालें आहे. विशेषतः युरोपांतील जर्मनी, इंग्लंड फ्रान्स इत्यादि देशांना ह्या पद्धतीचा उपयोग करून बाहेरील तेलावर अवलंबून न राहतां आपलीं यंत्रें चालवतां येणें शक्य आहे. अद्याप ही पद्धति फार खर्चाची आहे. पण युद्धकालांत ती वापरली गेली होती व पुढेंहि कदाचित् वापरली जाईल.

सरतेशेवटीं संयोगीकरणाच्या एका अगदीं नवीन क्षेत्राचा मी उल्लेख करणार आहे. आतांपर्यंत








## संयोगीकरणाची किमया

संयोगीकरणानें जीं द्रव्यें तयार केल्याचें मी सांगितलें त्यांची रासायनिक घटना गुंतागुंतीची होती हें तर खरेंच. पण तिचा छडा लावणें शक्य झालें; एवढेंच नव्हे तर ती द्रव्यें कृत्रिमरीत्या तयारहि करतां आलीं. पण कांहीं प्रकारचीं द्रव्यें सृष्टींत अशीं आढळलीं कीं त्यांची रासायनिक घटना व विशेषतः त्यांच्या अणूंचा आकार ह्याबद्दल बरेच दिवस कांहीं उलगडा होईना. रबर, कापसांतील सेल्युलोज्, रेशीम व लोकर ह्यांतील प्रोटीन हीं अशा तऱ्हेचीं द्रव्यें होतीं. त्यांचे अणू नीळ, मंजिष्ठ, क्विनीन इत्यादि द्रव्यांच्या अणूंच्या मानानें अति प्रचंड असून त्यांची घटना ठरवणें व त्यांची कृत्रिम निर्मिति करणें ह्या गोष्टी होण्यास अतिशय खटपट लागली. अनेक शास्त्रज्ञांनीं केलेल्या अविश्रांत श्रमानें अखेर ह्याहि गोष्टी साध्य झाल्या. आतां कृत्रिम रबर, रेयॉन–नायलॉनसारखे धागे, आर्डिल व व इतर प्रकारची कृत्रिम लोकर वगैरे पदार्थ आपण रोजच्या व्यवहारांत वापरतों. त्याचप्रमाणें प्लॅस्टिकच्या ज्या निरनिराळ्या वस्तूंशिवाय आपलें पदोपदीं अडेल त्यांची उत्पत्तीहि प्रचंड प्रमाणांवर होत आहे. कार्बोलिक कोळशाचें डांबर, पिंगट रंगाचें खनिज तेल, किंवा चुना, पाणी, मीठ अशीं द्रव्यें घेऊन त्यांपासून इंद्रधनुष्याशीं स्पर्धा करणारे रंग, प्रसंगीं माणसाचा जीव वांचवणारीं औषधें इत्यादि हरतऱ्हेचीं नवीं द्रव्यें संयोगीकरणाच्या किमयेनेंच निर्माण झालेलीं आहेत. ह्या सर्वांमुळें आपल्याला अनेक प्रकारच्या सोई उपलब्ध झाल्या आहेत हें निःसंशय. आपल्या सुखांत त्यांमुळें भर पडली आहे कीं नाहीं हा प्रश्न अर्थातच ज्याचा त्यानेंच सोडवायचा आहे.

---

## या रस्त्याची जुनी कहाणी !

या रस्त्याची जुनी कहाणी
या रस्त्याची रीतहि असली !

कितीक येऊन गेले येथें
यावरती चालून बिचारे
पुन्हां आपुले वळले मागें
अनन्त अंतर याला आहे
खंडहि कोठें नाहीं ठावा
कितीक गाड्या टांगे घोडे
मोटारी धावल्या कितीतरि
थकल्या दमल्या नाश पावल्या
पुरून उरला हा साऱ्यांना

कुणी भरजरी पोषाखांतिल
कुणी छबेली नाजुक सुंदर
विजयोन्मादी कुणि गर्वोन्नत
तपी, ऋषी कुणि महाकवी अन्
किती महात्मे कुणि मोहात्मे
अर्धपोटि कुणि कुणि कंगाल

वेडे बहिरे आंधळे कुणी
या रस्त्यावर चालत असतां
गांठूं गेले अनंत अन्तर
परंतु त्याच्या पलीकडे हा
पसरून होता दिगन्त दूर !

युगायुगांचें तप आचरितां
विस्तृत आहे अस्ताव्यस्त
धुळींत याच्या इतिहासाचीं
कितीक पानें चुरगळलेलीं
बखरकार हा खरडत आहे
कितीक घटना किती वल्गना
सुखदुःखाच्या गोष्टी ऐकत
द्वंद्वातीतासम हा झाला
येणारे येतील चालतिल
चालुन चालुन पुन्हां थांबतिल
परंतु याला नसें थांबणें
या रस्त्याची हीच कहाणी
या रस्त्याची रीतहि असली !

— गणेश कुडे








श्री. वि. म. बेडेकर

# ‘कैवल्यधामा’चे संस्थापक व संचालक स्वामी कुवलयानन्द

प्राचीन योगविद्येचें आधुनिक विज्ञानपद्धतीनें संशोधन करणाऱ्या सुप्रसिद्ध **‘कैवल्यधाम’** या संस्थेचे संस्थापक व संचालक **स्वामी कुवलयानंद** यांच्या वयाला गेल्या ७ सप्टेंबर १९५३ ला ७० वर्षे पूर्ण होऊन एकाहत्तरावें वर्ष लागलें. या निमित्तानें त्यांचा समुचित सत्कार करण्याकरितां सर एन्. व्ही. दिवाटिया यांच्या अध्यक्षतेखालीं एक ‘स्वामी कुवलयानन्द-सत्कार-समिति’ स्थापन झाली असून स्वामीजींचा सत्कार लवकरच होणार आहे. या सत्कारसमितीच्या कार्याला विविध क्षेत्रांतील अखिलभारतीय कीर्तीच्या अनेक नेत्यांनीं पाठिंबा दिला आहे.

कैवल्यधाम-संस्थेची संस्थापना १९२४ च्या ऑक्टोबरमध्यें लोणावळें येथें स्वामी कुवलयानन्दांनीं केली. स्वामी कुवलयानंद हें नांव देखील त्यांनीं त्याच वेळीं धारण केलें. त्या आधीं ते ज. ग. गुणे या नांवानें १९१६–१९२३ सालपर्यंत अमळनेरच्या खानदेश-शिक्षण-मंडळांत असून त्या कालखंडाचीं शेवटचीं दोन वर्षें (१९२१–२३) ते खा. शि. मंडळाच्या राष्ट्रीय महा-विद्यालयाचे प्राचार्य होते. १९१६ सालीं अमळनेरच्या खानदेश-शिक्षण-मंडळांत कांहीं ताज्या दमाचीं नवीन तरुण पदवीधर मंडळी दाखल होऊन त्या वेळेपासून अमळनेरच्या शैक्षणिक वातावरणांत कांहीं नवीनच चैतन्य खेळूं लागलें. हें चैतन्य निर्माण करणाऱ्या तरुण पदवीधरांमध्यें हल्लींचे स्वामी कुवलयानंद त्या वेळचे श्री. ज. ग. गुणे हे एक अग्रगण्य होते. मॅट्रिकच्या परीक्षेंत जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति पटकावलेले, लोकमान्य टिळक व बाबू अरविन्द घोष यांच्या व्यक्तिमत्त्वानें व विचारांनीं प्रभावित आणि राष्ट्रभक्तीनें प्रेरित झालेले, बडोद्याचे प्रो. माणिकराव यांच्या सर्वांगीण शारीरिक शिक्षणाच्या तालमींत तयार होऊन त्यांचे पट्टशिष्य म्हणून ख्याति पावलेले, एक ध्येयवादी, विद्वान् पदवीधर असा गुणे यांचा असामान्य लौकिक आधींच कानीं आल्यामुळें अमळनेरचा सुशिक्षित वर्ग आणि विद्यार्थी त्यांच्याबद्दल आदरभावना बाळगून होते. नंतरचें त्यांचें प्रत्यक्ष कार्य व व्यक्तिमत्त्व बघून ती आदरभावना दुणावली असल्यास नवल नाहीं. त्यांच्या जीवनांतून प्रतीत होणारा ऋषितुल्य आदर्श, त्यांचें संस्कृत, इंग्रजी, मराठी या भाषांवरील असामान्य प्रभुत्व, अध्यापनकौशल्य, गाढ विद्वत्ता, असाधारण वक्तृत्व, संघटनाचातुर्य इत्यादि गुणांमुळें त्यांनीं अमळनेर येथें असामान्य लोकप्रियता संपादन केली. त्यांच्या ठिकाणीं या वरील गुणांच्या बरोबरच शारीरिक-शिक्षणपटुत्वाची जी जोड मिळाली होती ती अपूर्व होती त्यामुळें गुणे यांच्या अमळनेर येथील वास्तव्यांत तेथील शिक्षणसंस्थेचा शारीरिकशिक्षण-विभाग हें अत्यंत कार्यक्षम, सांघिक भावनेनें (esprit de corpsनें) प्रेरित झालेलें व चैतन्यानें रसरसलेलें असें अंग बनून तें संस्थेचें एक प्रमुख आकर्षण ठरलें असल्यास आश्चर्य नाहीं. १९२१ सालीं अमळनेरची खानदेश-शिक्षण-संस्था ही राष्ट्रीय संस्था बनून, तिचें राष्ट्रीय महाविद्यालय स्थापन झालें. प्रा. गुणे त्याचे प्राचार्य झाले. त्या काळीं या शिक्षण-संस्थेंतील तरतरीत नवयुवकांचें पथक खादीचा गणवेष घालून लष्करी थाटांत, गुणे यांनींच रचलेल्या ‘आर्यो-द्धरिणी श्री भूजननी ही प्रणति’ या संचलनगीताच्या साथीवर ठेक्यांत संचलन करीत असतांनाचें स्फूर्ति-दायक दृश्य खानदेशस्थ कधींच विसरणार नाहींत.

अमळनेर येथील वास्तव्यांतच गुणे यांचा ‘कुवलया-नंदाचीं गाणीं’ हा काव्यसंग्रह प्रसिद्ध होऊन त्यांच्या व्यक्तित्वाच्या एका निराळ्याच अत्यंत तेजस्वी व प्रतिभाशाली पैलूचें महाराष्ट्रीयांना दर्शन झालें हीं त्यांचीं गाणीं लोकप्रिय होऊन विद्यार्थिवृंदांच्या ओठीं गुणगुणत होतीं. पुढें १९२४ सालीं कैवल्यधाम आश्र-माची स्थापना करून योगविद्येच्या मनन-संशोधन-प्रसाराला वाहून घेणाऱ्या कुवलयानंदांचा कुवलयानंद या नांवानें प्रथम परिचय रसिकांना अशा रीतीनें त्यांच्या काव्यसंपदेच्या द्वारें १९१८ च्या सुमारासच झाला

## कैवल्यधामाचे संस्थापक व संचालक स्वामी कुवलयानन्द

होता. 'कुवलयानंदाचीं गाणीं' हा आकारानें व काव्य-संख्येनें अत्यंत छोटा काव्यसंग्रह, पण त्यांतील काव्य-गुणामुळें मराठी काव्यसंपदेचें एक अभिनव लेणें होऊन राहण्याइतका असाधारण व मोलाचा आहे. आध्यात्मिक आनंदाची अनुभूति, त्या अनुभूतींतून प्रतीत होणारें मानव व निसर्ग यांचें ऐक्य ही या काव्यांतील प्रधान भावना असून त्या अनुभूतींत डुंबून हातीं लागलेले अनुभवमौक्तिक कवीनें या काव्यसंग्रहांत उधळून दिले आहेत. या काव्यसंग्रहाला प्रा. महादेव मल्हार जोशी यांची प्रस्तावना असून त्या प्रस्तावनेंत त्यांनीं या काव्य-संग्रहांतील काव्यगुण कसे असाधारण आहेत याचें अत्यंत मार्मिक विवेचन केलें आहे. पुढें योगविषयक संशोधन व कैवल्यधामाचा व्याप यांत व्यापृत झाल्यामुळें स्वामी कुवलयानंदांची काव्यनिर्मिति प्रसिद्धिदृष्ट्या स्थगित झालेली दिसत असली तरी त्यांच्या निकटवर्ती-यांना माहीत आहे कीं, मधून मधून विरंगुळा म्हणून त्यांनीं लिहिलेल्या मराठी कविता त्याचप्रमाणें जगन्नाथ पंडितांच्या मधुर नि डौलदार शैलीची आठवण करून देणाऱ्या संस्कृत कविता त्यांच्या संग्रहीं अप्रसिद्ध अवस्थेंत पडून आहेत.

१९२१ सालीं त्यांच्या जीवनांतील पुढचें ध्येय निश्चित करणारी एक अत्यंत महत्त्वपूर्ण घटना घडून आली. ती म्हणजे नर्मदातटाकीं वास्तव्य करून रहाणारे **महायोगी परमहंस श्रीमन् माधवदास महारा**ज यांची भेट होय. परमहंसांच्या सांनिध्यांत कुवलयानन्दांना योगविद्येची दीक्षा मिळाली. परमहंसांच्या मार्गदर्शना खालीं यौगिक क्रिया व प्रक्रिया करीत असतांना कुवलया-नंदांना आपल्या शरीरावर व मनावर असे कांहीं आश्चर्यकारक परिणाम होत असलेले दिसून आले कीं ते पाहून या योगविद्येच्या सामर्थ्यापुढें ते स्तिमित झाले! या होणाऱ्या परिणामाचें शास्त्रीय दृष्ट्या त्यांस गूढ उक-लेना. त्यांचें मन ध्येयवादी व अध्यात्मप्रवण असलें तरी त्याबरोबरच तें कठोर बुद्धिवादीहि आहे. कोणतीहि घटना कितीहि चमत्कृतिजनक असो, तिची बौद्धिक दृष्ट्या उपपत्ति लागली पाहिजे अशी त्यांच्या मनाची घडण बनलेली होती. त्यांचा शरीरविज्ञानशास्त्राचा अत्यंत सूक्ष्म व अद्ययावत् अभ्यास झालेला होता. योगविद्येच्या प्रक्रियांतून येणाऱ्या अनुभवांची उपपत्ति आधुनिक शास्त्रीय ज्ञानाच्या द्वारें न लागणें म्हणजे त्यांच्या सत्या-न्वेषी शास्त्रपूत बुद्धीला एक आव्हानच होतें. त्यावेळीं व अजूनहि आपल्या देशांत व इतरत्र पुष्कळ योगसंस्था अस्तित्वांत होत्या व आहेत, पण त्यांपैकीं कोणत्याहि संस्थेंतून यौगिक प्रक्रियांचा आधुनिक वैज्ञानिक दृष्ट्या प्रत्यक्ष वैज्ञानिक प्रयोगशाळांतून अभ्यास कोणी केलेला नव्हता. योगविद्या हा अध्यात्माचा, अतीन्द्रिय ज्ञानाचा, अतिभौतिक अनुभूतीचा प्रान्त आहे, तो अनुभव प्रयोगशील शास्त्राच्या पलीकडचा आहे असें एकी-कडे शास्त्रज्ञ म्हणत; तर दुसरीकडे योगाभ्यास करणारी मंडळी आपला यौगिक क्रियांच्या द्वारें येणारा उच्च कोटींतला अनुभव शास्त्रीय कसोटीच्या द्वारें पारखायला व तो सामान्य जनांना उपलब्ध करून द्यायला तयार नव्हते. "परमेश्वरकृपेनें हा उच्च आनंदाचा अनुभव मिळतो आहे ना? तो कां व कसा प्राप्त होतो, याची उपपत्ति शोधण्याची उठाठेव कशा-ला? मध चाखणारा मधुकर धन्य होय. तत्त्वान्वेष करणारे करंटे!" अशी त्यांची भूमिका होती. योग-विद्येबाबत अशा दुहेरी परिस्थितीचा पेंच बघून कुवलयानंदांची सत्यजिज्ञासा अधिकच प्रदीप्त झाली. त्यांची योग-संशोधनाची प्रेरणा उत्कटतेस पोहोंचली. या यौगिक प्रक्रियांची शास्त्रीय उपपत्ति शोधण्याचा त्यांना सारखा निदिध्यासच लागला व त्यांनीं आपलें हेंच जीवितकार्य निश्चित केलें.

त्याप्रमाणें योगविद्येचें आधुनिक वैज्ञानिक दृष्ट्या संशोधन करावयाचें कुवलयानन्दांनीं ठरवून लगेच सुरुवात केली. उड्डियान व नौली या दोन यौगिक क्रिया करीत असतांना शारीरिक दृष्ट्या कोणते फरक होतात यावर त्यांनीं वायुमापन यंत्राच्या साहाय्यानें प्रयोग ( Manometric Experiments ) करून पाहिले. त्यांचे बडोदे स्टेट हॉस्पिटलमध्यें एक्स रे फोटो-हि घेतले. आणि या प्रयोगांमध्यें त्यांना अकल्पित यश मिळालें. उड्डियान व नौली या दोन योगक्रियांच्या बाबतींत त्यांनीं जी बौद्धिक उपपत्ति बसविली होती, ती प्रयोगानें खरी आढळून आली. अगदीं आरंभींच्या या संशोधनांत त्यांना ज्याचा शोध लागला त्यांस त्यांनीं आपल्या गुरुदेवांचें नांव दिलें. त्यांच्या संशोधनाचें स्वरूप असें: सामान्यतः मनुष्या-च्या मोठ्या आतड्यांतील दाब हा बाहेरील वातावरणा-च्या दाबाइतका असतो. परंतु नौली-क्रियेमध्यें हा








मोठ्या आंतड्यांतील दाब बाहेरील वातावरणाच्या दाबापेक्षां कमी होतो. म्हणजे तेथें ऋणनिपीडन (Negative Pressure) उत्पन्न होतें. हा शोध अगदी नवा असल्याकारणानें स्वामीजींनीं हें 'ऋण-निपीडन' आपल्या पूज्य गुरुदेवांच्या नांवाशीं संबद्ध केलें आणि त्यांचें '**श्रीमन्माधवदास ऋणनिपीडन**' असें पारिभाषिक नामकरण केलें. या आपल्या संशोधनाचे निष्कर्ष त्यावेळीं १९२२-२३ च्या सुमारास डॉ. टागोर, बोस, नाडगिर यांसारख्या सुप्रसिद्ध शरीरविज्ञान-वेत्त्यांना त्यांनीं कळविले. या डॉक्टरांनीं या संशोधनाचें प्रशंसापूर्वक कौतुक करून तें पुढें चालू ठेवण्यास प्रोत्साहन दिलें. या आरंभींच्या यशानें कुवलयानन्दांना उत्साह उत्पन्न होऊन प्राचीन योगशास्त्रांतील आसनें, प्राणायाम, मुद्रा, क्रिया याबाबतींत अधिक संशोधन करावयाची प्रेरणा मिळाली हें खरें. पण हें काम एकट्या दुकट्या व्यक्तीचें नव्हे. अशा कार्याकरितां एखाद्या सुसंघटित संस्थेचें बळ पाहिजे असतें. अखंड तत्त्व-जिज्ञासा बाळगणारे त्यागी, बुद्धिमान्, प्राचीन योग व आधुनिक शास्त्रें यांच्या अभ्यासाला आजन्म वाहून घेणारे, योगाचें शास्त्रीय दृष्ट्या संशोधन हेंच आपलें जीवितकार्य मानणारे असे अनेक कार्यकर्ते मिळून त्यांची संस्था किंवा संघटना तयार होऊन ती पिढ्यानुपिढ्या कार्य करीत राहिली तर हें संशोधनकार्य यशस्वी होण्याची निश्चिति असते. असे कार्यकर्ते व या कार्याला लागणारी इतर साधनसामग्री, त्याकरितां लागणारें द्रव्यबळ कसें उपलब्ध होणार हाहि एक प्रश्नच होता. तरी पण या अडचणींनीं डगमगून न जातां 'उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा' अशा निष्ठेनें आणि प्रेरणेनें कुवलयानंदांनी 'निश्चयाचें बळ' एकत्र करून शुभारंभ करावयाचें ठरविलें. १९२४ च्या ऑक्टोबर मध्यें दसऱ्याला त्यांनीं लोणावळयाजवळील वाळवण गांवीं 'कैवल्यधाम' या योगाश्रमसंस्थेची स्थापना केली. आपल्या जीवनाच्या या नवीन 'आश्रमां'त प्रवेश करतां-ना नवीन दीक्षेचें सूचक असें कुवलयानंद हें नांव धारण करून त्यांनीं कार्यास धडाडीनें प्रारंभ केला.

कैवल्यधाम-आश्रमाची स्थापना केल्यावर लगेच स्वामी कुवलयानंदांनीं '**योगमीमांसा**' नांवाचें त्रैमासिक सुरू करून त्यांतून आपल्या संस्थेंतून होणाऱ्या योग-विद्येवरील विज्ञानाधिष्ठित संशोधनाचें फलित मांडण्यास सुरुवात केली. 'योगमीमांसा' हें त्रैमासिक त्यांतील अभिनव विषयामुळें, त्यांतील शास्त्रशुद्ध मांडणीमुळें, त्याच्या ओघवती डौलदार प्रसन्नगंभीर भाषेमुळें कल्पनेपलीकडे यशस्वी झालें. 'योगमीमांसें'त शास्त्रीय (Scientific), शास्त्रीयप्राय (Semi-Scientific) व लोकसुगम (Popular) असे तीन विभाग ठेवून तज्ज्ञापासून तों तहत सामान्य वाचकांची सोय केली होती. 'योगमीमांसे'चें हिंदुस्थानांतच नव्हे तर इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका या पाश्चात्त्य देशांतील तज्ज्ञ शरीरमानसशास्त्रज्ञांकडून अत्यंत प्रशंसापूर्वक स्वागत झालें. संस्थेला द्रव्याची मदत मिळण्यास त्यामुळें साहाय्य झालें. पोरबंदरच्या राणासाहेबांनीं दरवर्षी तीन हजार रुपये अशी दहा वर्षे मदत केली. त्यांच्या नांवानें 'राणा नटवरसिंग रुग्णविज्ञान शाळा' निघाली. 'योग-मीमांसा' मासिकाच्या द्वारें जें कुवलयानंदांनीं योग-विद्येवर लेखन केलें त्यापैकीं कांहीं 'Popular Yoga' या मालेंत 'योगासनें, प्राणायाम', इत्यादि ग्रंथांच्या रूपानें उपलब्ध आहे.

कैवल्यधाम-संस्थेनें प्रत्यक्ष यौगिक प्रक्रियाद्वारें रुग्णसेवा, रोगपरिहार याबाबतींत गरजूंना सल्ला द्याव-याचें व उपचार करावयाचें काम आरंभापासूनच सुरूं केलें होतें. या सल्ला मागणाऱ्या गरजूंची मागणी पुढें इतकी वाढली कीं, कैवल्यधाम-संस्थेला मुंबईला एक योगविद्येचें आरोग्यकेंद्र लवकरच सुरूं करावें लागलें.

अशा प्रकारें आधुनिक विज्ञानाच्या साहाय्यानें संशोधिलेल्या प्राचीन योगविद्येच्या ह्या आरोग्यलाभाच्या मार्गाकडे, तज्ज्ञांबरोबर प्रांतिक सरकारांचेंहि लक्ष वेधलें. युक्तप्रांत सरकारनें तर आपले एक एफ्. आर. सी. एस्.-पदवीविभूषित शरीरशिक्षण-तज्ज्ञ 'योगविद्या प्रणीत व्यायाम शिक्षणसंस्थांतून सुरूं करणें कितपत व्यवहार्य आहे' हें अभ्यास करून ठरविण्याकरितां कैवल्यधाम-आश्रमांत पाठविले होते. त्या तज्ज्ञांच्या अनुकूल शिफा-रसीमुळें युक्तप्रांत सरकारनें योगव्यायाम आपल्या शिक्षण-संस्थांतून सुरूंहि केले. स्वतः कुवलयानंद ह्यांनीं १९३२ सालीं, युक्तप्रांत सरकारच्या विनंतीवरून, तेथील शिक्षकां-करितां योगव्यायामांचा एक वर्ग लखनौ येथें चाल-विला. मुंबई व इतर प्रांतांनींहि हे योगव्यायाम आपल्या शाळांतून सुरूं केले आहेत.

कैवल्यधामानें संशोधिलेल्या या योगाधिष्ठित शारी-












रिक-मानसिक शिक्षणपद्धतीनें कांहीं विश्वविद्यालयांचेंहि लक्ष वेधून घेतलें आहे. त्रावणकोर-सरकारनें आपल्या विद्यापीठीय शारीरिक शिक्षणाच्या कार्यक्रमांत यौगिक व्यायाम समाविष्ट करण्याकरितां कैवल्यधामाकडे एका सेवकाची मागणी केली. अमेरिकेंतील येल विद्यापीठाच्या एका संशोधक विद्यार्थ्यानें कैवल्यधाम-संस्थेंत एका योगान्तर्गत विषयावर अभ्यास व सशोधन करून आपल्या विद्यापीठाची पीएच्. डी. ही पदवी मिळविली. हार्वर्ड विद्यापीठ लवकरच तेथें 'Creative Altruism' ही शाखा सुरूं करणार आहे. त्याकरितां कैवल्यधामाजवळ त्यानें सहकार्य मागितलें आहे. फ्रान्समधील एक प्रसिद्ध अणुशास्त्रज्ञ ( nuclear scientist ) नुकतेच कैवल्यधाम संस्थेमध्यें योगशिक्षणाकरितां येऊन राहिले होते. योगविद्येच्या संशोधनाबाबत त्यांनीं सहकार्य देण्याचें आश्वासन दिलें आहे.

योगप्रणीत व्यायामांच्या द्वारें, रोगप्रतिबंध, रोगपरिहार, रुग्णसेवा याबद्दलच्या ज्ञानाचा प्रसार व प्रत्यक्ष कार्य यामुळें स्वामीजींच्या कैवल्यधाम या संस्थेकडे आरोग्येच्छु लोकांच्या मागण्या अधिकाधिक येऊं लागल्या याचा उल्लेख वर आलाच आहे. तदनुसार कैवल्यधामाची मुंबईला एक शाखा १९३२ पासून काढण्यांत आली. पुढें १९३६ सालापासून कैवल्यधामाचे हें मुंबई आरोग्यकेंद्र चौपाटीला लागून असलेल्या जागेंत स्वतःच्या इमारतींत कार्य करीत आहे. मुंबई सरकारनें नाममात्र भाडें आकारून दिलेल्या या जागेवर, सर चुनीलाल महेता यांनीं आपल्या मुलाच्या स्मरणार्थ दिलेल्या २०००० रु. देणगीच्या साहाय्यानें मुंबईच्या कैवल्यधाम-केंद्राची इमारत बांधली असून, त्या आरोग्यकेंद्राचें नांव ' ईश्वरदास चुनीलाल यौगिक आरोग्यकेंद्र ' असें आहे. कैवल्यधामाचें हें केन्द्र स्वायत्त असून अत्यंत कार्यक्षम आहे. दररोज २०० – ३०० लोक या केंद्रांत आरोग्यसाधनेकरितां येत असतात त्यांमध्यें सर्व धर्मांचे, सर्व जातींचे लोक असून, त्यांत न्यायमूर्ति अग्रगण्य वकील, व्यापारी इत्यादि सर्व धंद्यांतील लोक आहेत. सौराष्ट्रमध्यें राजकोटला कैवल्यधामाची एक शाखा १९४३ सालीं काढण्यांत आली असून, ती सांस्कृतिक कार्यहि करीत आहे. सौराष्ट्रसरकारची १००० रु. व राजप्रमुखांची १००० रु. अशी वार्षिक मदत या राजकोटकेन्द्राला मिळत असते.

मुंबई सरकारनें १९३६ सालीं मुंबई राज्याकरितां एक शास्त्रशुद्ध व व्यापक शारीरिकशिक्षण-योजना आंखण्याकरितां एक शारीरिकशिक्षण-समिति नेमली. त्या शारीरिकशिक्षण-समितीचे अध्यक्ष स्वामी कुवलयानंद हे होते. या समितीच्या शिफारशीनुसार मुंबईसरकारनें एक कायमचेंच शारीरिकशिक्षणमंडळ असावें असें ठरविलें. कैवल्यधाम आश्रमाच्या वाढत्या जबाबदाऱ्या व व्याप यामुळें १९५० सालीं त्यांनीं आपण होऊनच सोडून देईपर्यंत, त्या मंडळाचे स्वामीजी सतत १२ वर्षें अध्यक्ष होते. मुंबई राज्यांतील कांदिवली येथील शारीरिक-शिक्षण-महाविद्यालय व शारीरिकशिक्षणयोजना यांमागील आरंभींचें मार्गदर्शन व नेतृत्व स्वामीजींचें आहे ही गोष्ट स्वामीजींचा शारीरिक-शिक्षणक्षेत्रांतील अधिकार सर्वमान्य झाल्याची साक्ष आहे. मध्यवर्ती सरकारच्या शारीरिकशिक्षण-सल्लागारमंडळाचे ते एक सदस्य असून प्लॅनिंग कमिशनच्या 'सामाजिक कल्याण मंडळा-' ( सोशल वेलफेअर पॅनेल)चेहि ते एक सदस्य आहेत.

लोकांच्या वाढत्या मागणीमुळें कैवल्यधाम-आश्रमाच्या आरोग्यविषयक कार्याचा व्याप केंद्रांच्या द्वारें इतका वाढला कीं, संस्थेचा जो एक मूळ प्रमुख हेतु योगशास्त्रावरील वाङ्मयाचें संशोधन आणि योगशास्त्रांत सांगितलेल्या क्रियाप्रक्रियांचे आधुनिक वैज्ञानिक दृष्टीनें संशोधन – याकडे यावें तसें लक्ष स्वामीजींना देतां आलें नाहीं. म्हणूनच कैवल्यधामाच्या स्थापनेच्या बुडाशीं असलेल्या मूळ हेतूकडे संघटितपणें, पद्धतशीर लक्ष देतां यावें म्हणून १९४४ सालीं कैवल्यधामाश्रमाचीच एक **'श्रीमन्माधव योगमंदिर-समिति '** स्थापन करण्यांत आली. त्या समितींत आश्रमाच्या कार्यकर्त्या आजीवसेवकांशिवाय, भौतिक शास्त्रांच्या त्याचप्रमाणें समाजशास्त्रांच्या क्षेत्रांतील कार्यकर्ते विद्वान् तज्ज्ञहि घेण्यांत आले आहेत. या समितीकडे योगविद्यासंबद्ध संशोधन आणि शिक्षण यांचें संघटन सोंपविलें आहे. मुंबई-सरकार व केंद्रसरकार या समितीच्या साहित्य व विज्ञान-विषयक संशोधनकार्याला वार्षिक मदत देत आलें आहे.

दोन वर्षांपासून कैवल्यधाम या संस्थेनें लोणावळयास 'योग आणि सांस्कृतिक समन्वय यांचें महाविद्यालय'– 'शेठ गोवर्धनदास सेक्सेरिआ कॉलेज ऑफ योग ॲन्ड










कल्चरल सिंथेसिस'—काढलें आहे. या महाविद्यालयांत सुशिक्षित तरुणांना घेऊन त्यांच्याकरवीं योगविद्येंतील रहस्यांचा वैज्ञानिक दृष्ट्या अभ्यास करविणें व मानवतेची सेवा करण्याकरितां बौद्धिक व आध्यात्मिक दृष्ट्या ते पात्र होतील अशी प्रगति करून घेण्यास त्यांना साहाय्य करणें हें या महाविद्यालयाचें उद्दिष्ट आहे. या योगमहाविद्यालयाची स्थापना म्हणजे कैवल्यधाम - आश्रमाच्या विकासावस्थेंतील एक अत्यंत महत्त्वाचा टप्पा आहे. या महाविद्यालयामुळें, कैवल्यधाम-आश्रमाचें जें मूळ ध्येय योगविद्येचें संशोधन आणि मानवी हिताकरितां योगविद्येचा प्रसार तें कार्यकर्त्यांपुढें सतत जागृत आणि वर्धिष्णु रहाण्यास मदत होणार असून, संस्थेंत कार्यक्षम कार्यकर्त्यांची परंपरा निर्माण होण्याची शाश्वती उत्पन्न झाली आहे.

गेल्या तीस वर्षांतील कैवल्यधामसंस्थेचें कार्य व त्या संस्थेचा वाढता व्याप हें स्वामी कुवलयानंदांच्या असामान्य कर्तृत्वाचें मूर्तिमंत प्रत्यंतर आहे. गेल्या तीस वर्षांच्या अवधींत स्वामी कुवलयानन्दांनीं योगविद्येबाबत लोकांच्या असलेल्या अशास्त्रीय व भ्रामक समजुती दूर करण्याचा अखंड प्रयत्न केला असून, प्राचीन योगविद्येचीं रहस्यें आधुनिक विज्ञानाच्या प्रयोगशील निकषावर पारखून पाहण्याचें कार्य चालविलें आहे. योगविद्या म्हणजे प्राचीन भारतांत परिणति पावलेली एक श्रेष्ठ कला व शास्त्र होय. त्या श्रेष्ठ कलेचें व शास्त्राचें स्वरूप बुद्धिवादाच्या भूमिकेवरून आकलन होण्यास स्वामीजींचे गौरवास्पद प्रयत्न कारणीभूत झाले आहेत.

मनुष्याचें शरीर अत्यंत कार्यक्षम बनवून, त्याच्या मानसिक शक्ती उन्नत व विकसित करणें, त्याच्या वासनांचें शुद्धीकरण करून त्याला आध्यात्मिक आनंदाचा व परमशान्तीचा लाभ करून देणें, हें योगशास्त्राचें ध्येय आहे असें सामान्यतः समजलें जातें. आधुनिक विज्ञानानें भौतिक सृष्टीचीं रहस्यें बरींच उलगडलीं असलीं तरी मानसिक सृष्टीचीं रहस्यें अजून अज्ञातच आहेत. वैज्ञानिक प्रगतीमुळें भौतिक सुखसमृद्धि मानवाच्या आवाक्यांत आलेली असली, तरी त्या सुखसमृद्धीचा आनंद योग्य रीतीनें उपभोगण्याइतकें मानवाचें मन विकसित झालेलें नाहीं. संशयवाद, वैफल्य, असुरक्षिततेची चिन्ता, युद्धाचें भय यांनीं आधुनिक मानवाचें मन ग्रासलें आहे. विज्ञाननिष्ठ बुद्धि आणि अशान्त मन – असें त्याचें व्यक्तित्व दुभंगलें आहे ! आधुनिक विज्ञाननिष्ठबुद्धिवादाशीं सुसंगत असें मानवाचें एकसंध व्यक्तित्व कसें निर्माण करावयाचें, मानवाला मानसिक शान्तीचा लाभ कसा करून द्यावयाचा, हा आधुनिक विचारवंतांपुढें मोठा प्रश्न आहे.

या प्रश्नाचें उत्तर प्राचीन भारतीय आध्यात्मिक विचारसंपदेमध्यें सांपडेल असा कांहींना साधार विश्वास वाटतो. भारतीय योगशास्त्र हें भारतीयांच्या आध्यात्मिक विचारसंपदेमधील एक अमोलिक ठेवा आहे, अशी आपली भावना आहे. प्राचीन योगशास्त्र शास्त्रीय प्रयोगपद्धतीच्या कसोटीवर पारखून त्या भावनेचें सत्यत्व पहाण्याचा **स्वामी कुवलयानंद** यांनीं गेलीं ३० वर्षें सतत प्रयत्न चालविला आहे. त्यांना कांहीं प्रमाणांत जें यश मिळालें आहे, त्यावरून त्यांचा हा प्रयत्न किती अभिनव आहे याची कल्पना येईल. कैवल्यधामाच्या रूपानें साकार झालेला स्वामीजींचा हा प्रयत्न अधिकाधिक यशस्वी होवो, प्राचीन योगविद्येच्या संशोधनाच्या निमित्तानें मानवाच्या मनाचीं रहस्यें उलगडून दाखवून शान्त, दान्त असा नवीन मानव निर्माण करण्याच्या कार्यास '**कैवल्यधाम**' हातभार लावो, असें स्वामीजींच्या सप्तत्यब्दपूर्तीच्या निमित्तानें मनःपूर्वक इच्छितों.

---

## 'राष्ट्रधना'चा 'बेकारीनिवारणविशेषांक'

नागपूर येथील '**गोविंदराम सेक्सेरिया अर्थ-वाणिज्य महाविद्यालया**'नें आपल्या '**राष्ट्रधन**' या नियतकालिकाचा २६ जानेवारी १९५४ या दिवशीं **बेकारीनिवारणविशेषांक** काढला आहे. या अंकांत मराठी, हिन्दी व इंग्रजी असे तीन विभाग आहेत. त्यांत इंग्रजी विभाग विषयाच्या विविधबाजू व त्यांचें विवेचन या दृष्टीनें इतर विभागांपेक्षां अधिक समृद्ध असून या विभागांत, बेकारीविषयीं यथातथ्य अचूक आंकडेवार माहितीचा अभाव, लोकसंख्येची वाढ, जमीनीची फेरवांटणी, भांडवलशाही, बेकारांची बेकारीच्या काळांतील तरतूद इत्यादी बेकारीशीं संबद्ध असलेल्या विषयांवर प्राध्यापक लेखकांचे लेख आले आहेत. मराठी विभागांत 'आंतरराष्ट्रीय मजूर संघटना व बेकारी' 'बेकारीनिवारणाचे मौलिक उपाय' व 'अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील बेकारीनिवारण' हे लेख उल्लेखनीय आहेत. या 'बेकारीनिवारणविशेषांकां'त कांहीं ललित लेखहि आहेत. पण त्यांत विशेष गुणानें व विस्तारानें उल्लेखनीय म्हणजे प्रा. वा. कृ. चोरघडे यांनीं डॉ. कृष्णलाल श्रीधराणी यांच्या मूळ गुजराती नाटिकेवरून अनुवादिलेली 'वटवृक्ष' ही एकांकिका होय.








## ग्रंथपरिचय

### ' Philosophical Essays '

( ' तात्त्विक निबंध ' ) ( इंग्रजी )

( लेखक : प्राध्यापक प्र. रा. दामले; प्रस्तावना-लेखक : डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्, प्रकाशक : एशिया पब्लिशिंग हाऊस, मुंबई; प्रकाशनकाल : जानेवारी १९५४; आकार : डेमी; पृष्ठसंख्या : १० + २०७; किंमत : रु. ९-१२. )

पुण्याच्या वाडिया कॉलेजमधील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक श्री. प्रभाकरपंत दामले हे गेलीं उणींपुरीं वीस वर्षें तत्त्वज्ञानाचे शिक्षक म्हणून महाविद्यालयीन जगतांत माहित आहेत. ते मूळचे मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतील तत्त्वज्ञानाचे विख्यात प्राध्यापक ख्रिस्तवासी जे. सी. पी. दान्द्राद यांचे शिष्य. सदरहू प्राध्यापक दान्द्राद हे एक मोठे विद्वान् व विचारवंत तत्त्वज्ञ म्हणून मोठे नामवंत होते. त्यांचे विद्यार्थी त्यांच्या कुशल अध्यापनावर मोठे लुब्ध असतच. परंतु त्यांच्या अध्यापनाचा आणखी एक विशेष असा कीं त्यानें त्यांच्या शिष्यांत तात्त्विक विषयांसंबंधीं स्वतंत्र विचार करण्याची आवड उत्पन्न होई. या प्राध्यापकांच्या भोंवतीं नेहमीं तत्त्वजिज्ञासु विद्यार्थ्यांचें मंडळ असावयाचें; व त्याच्या मध्यभागीं बसून हे प्राध्यापक त्यांजशीं सॉक्रेटिसाप्रमाणें तत्त्वसंवाद करून त्यांची जिज्ञासाजागृति व विचारचालन करावयाचे. अशा या मंडळांत प्रा. दामले यांचें विद्यार्थिदशेंतील संस्कारक्षम जीवन गेलें आहे व त्याचा त्यांच्या वैचारिक जीवनावर उत्कृष्ट परिणाम झालेला आहे. या जीवनक्रमांत त्यांना स्वतंत्र तत्त्वचिंतनाचें जें वळण मिळालें त्यांतच प्रस्तुत ग्रंथाचा उगम आहे असें मला, प्रा. दामले यांच्या वैचारिक जीवनाचा इतिहास माहित असल्यामुळें, वाटतें. प्रा. दामले यांनीं आपल्या प्रस्तावामध्यें आपल्या वैचारिक चरित्राचा जो थोडा ओझरताच उल्लेख केला आहे त्यांत वरील घटनेचा समावेश नाहीं. पण त्यांच्या खासगी संभाषणांत तो नेहमीं येत असतो; व तो या ग्रंथोत्पत्तीशीं अनुरूप असल्यानें त्याचा येथें निर्देश केला आहे एवढेंच.

प्राध्यापक दामले यांनीं स्वतंत्र तत्त्वचिंतनाचें बाळकडू विद्यार्थिदशेपासूनच घेतलें असलें तरी त्यांचें परिपक्व तत्त्वचिंतन साहजिकच ते स्वतः अध्यापनास लागल्यानंतरच झालें हें साहजिकच आहे. विशेषतः दहा वर्षांपूर्वीं त्यांनीं पुण्यास "पुणें तत्त्वज्ञानसंघ" ('पूना फिलॉसफी यूनियन ') ही तत्त्वजिज्ञासूंची तत्त्वचर्चा घडवून आणण्यासाठीं जी संस्था स्थापन केली तेव्हांपासून त्यांचें तत्त्वचिंतन या संस्थेतील चर्चेसाठीं लेखनिविष्टहि होऊं लागलें. या संस्थेंत व इतरत्रहि त्यांनीं वेळोंवेळीं जे स्फुट निबंध वाचले किंवा (लेखनिविष्ट निबंधरूपी) व्याख्यानें दिलीं, त्यांचाच प्रस्तुत 'Philosophical Essays' या ग्रंथांत संग्रह केला आहे. ग्रंथांत एकंदर चोवीस निबंधांचा समावेश केलेला आहे. या चोवीस निबंधांत विषयदृष्ट्या तीन वर्ग पाडले आहेत : (१) **सत्ताशास्त्र** ( Metaphysics ); ( २ ) **व्यावहारिक तत्त्वज्ञान** ( Practical Philosophy ) व (३) **भारतीय तत्त्वज्ञान** ( Indian Philosophy ). पैकीं पहिल्या विषयावर चौदा निबंध, दुसऱ्यावर सात व तिसऱ्यावर तीन – अशी वांटणी आहे. या सर्वांचा विमर्शक समाचार येथें घेणें अशक्यच आहे. परंतु त्यांचें सर्वसामान्य वर्णन करून उदाहरणादाखल कांहीं थोड्यांचा वेगळा उल्लेख करणें एवढेंच या परिचयलेखांत शक्य आहे.

हे निबंध स्फुट स्वरूपाचे आहेत. म्हणजे त्यांत पूर्वसंकल्पित अशी विषयांची संगतवार निवड किंवा एकाद्या सिद्धांताचें आमूलाग्र व सलग केलेलें विवेचन असें नाहीं. वेळोवेळीं जसजसे स्वतःस विषय सुचले किंवा ( व्याख्यानासाठीं ) सुचविले गेले, तसतसे ते ते विषय घेऊन त्या विषयांवरील आपल्या चिंतनिका त्यांनीं या निबंधांत ग्रथित केल्या आहेत. निबंध सामान्यतः सामान्य जनांकरितां योजिले असल्यानें त्यांत ग्रंथांतरींच्या उताऱ्यांचें भरताड नाहीं, पायटीपांची अडगळ नाहीं, किंवा पारिभाषिक शब्दांचें विशेष जंजाळ माजविलेलें नाहीं. प्रत्येक घेतलेल्या विषयासंबंधींचें मूलभूत, स्थूल, संक्षिप्त व व्यवस्थित विवेचन प्रत्येक निबंधांत केलेलें आहे. निवडलेल्या विषयाभोंवतीं त्यांचा मनोभृंग तन्मयतेनें गुंजन करतो व त्यांतून त्यानें ग्रहण केलेला तत्त्वमधु वाचकांस मोठ्या आत्मसंतोषानें ते चाखवीत आहेत असा ठसा वाचकाच्या मनावर हे निबंध वाचतांना उमटतो. किंवा रेशमाचा किडा ज्याप्रमाणें आपल्याभोवतीं रेशमी कोश विणतो त्याप्रमाणें लेखकानें प्रत्येक निबंधांत आपल्या विषयाभोंवतीं तत्त्वकोश विणला आहे असेंहि म्हणतां येईल.

किंवा लेखकानें स्वतःच्या मनोविनोदनासाठीं तयार केलेली विषयवार सारणी किंवा टिप्पणी असें या निबंधांचें स्वरूप आहे. या दृष्टीनें या निबंधांस तात्त्विक भावनिबंध ( philosophical lyrics ) असेंहि नांव देतां येईल. या निबंधांत विशाल स्वरूपाची मौलिकता आहे असें कांटेकोरपणानें म्हणतां आलें नाहीं तरी त्यांत विचाराचें स्वातंत्र्य, जिवंतपणा व ताजेपणा हे गुण निश्चित प्रत्ययास येतात. त्यांत ग्रंथांचे व तत्त्वज्ञांचे उल्लेख फारसे करावयाचे नाहींत असेंच धोरण स्वीकारलेलें असल्यानें विद्वत्तेचा बडिवार त्यांत नाहीं. पण प्रत्येक विषयासंबंधींच्या अनुकूल-प्रतिकूल व प्रातिनिधिक मतप्रणालींचे बिनचूक व निःपक्षपाती उल्लेख आहेत. आणि स्वतः प्रतिपादिलेल्या विचार-सरणींच्या इतिहासप्रसिद्ध व प्रातिनिधिक पुरस्कर्त्या तत्त्वज्ञांचे नामोल्लेख फारसे करण्याचें त्यांचें धोरण नसलें तरी त्या त्या विचारसरणी त्यांनीं आत्मसात् करून, आपल्या स्वतःच्या चिंतनाच्या मुशींत ओतून मगच त्या निबंधांत मांडल्या आहेत याचा अचूक व निःशंक प्रत्यय वाचकांस ते आपल्या लेखनांत निश्चित घडवितात. निबंधांची भाषाहि प्रौढ व ओघवती असून सर्वच निबंध वाचनीय असे उतरले आहेत. ही कामगिरी लहान नाहीं.

प्रत्यक्ष निबंधांच्या आशयाकडे वळल्यास त्यांतील प्रत्यक्ष विषयप्रतिपादनाची समग्र ओळख करून देण्यास येथें सवड नाहीं. परंतु सर्वसामान्य रीतीनें असें म्हणतां येईल कीं निबंधलेखकानें कोणत्याहि एकाद्या विशिष्ट वा एकांतिक तात्त्विक मतप्रणालीचा समग्र स्वीकार किंवा अनुयायित्व करण्याचें टाळलें आहे. सत्ताशास्त्रांतील त्यांची सामान्य विचारसणी, कोणत्याहि विशिष्ट निबंधाचा उल्लेख न करतां, पुढीलप्रमाणें त्यांनींच दिग्दर्शित केली आहे : चिद्वाद (Spiritualism) किंवा जडवाद (Materialism), कल्पनावाद (Idealism) किंवा वास्तववाद (Realism)—हे वाद मुख्यतः दृष्टिकोणाचेच फरक आहेत अशी त्यांची श्रद्धा आहे. त्या प्रत्येकांत कांहीं सत्यांश आहे असें त्यांस वाटतें. सत् (Reality) आणि नामरूप ( Appearance ) या दोन्हींसहि वेगवेगळ्या दृष्टींनीं सारखीच मान्यता दिली पाहिजे असें त्यांचें सिद्धांतन आहे. तत्त्वज्ञान (Philosophy) व विज्ञान (Science) या उभयतांमध्यें पद्धतीचा फरक असून 'अनुभवाचें बुद्धिसमीक्षण' (deliberate reflection on experience) हीच उभयसामान्य पद्धति होय असा त्यांचा निष्कर्ष आहे. तत्त्वज्ञानाच्या जीवनांतील स्थानासंबंधानें त्यांचें म्हणणें असें कीं तत्त्वज्ञान्यानें आपल्या विशिष्ट व्यवसायांतच आत्मविश्वासपूर्वक अनुभवाच्या समीक्षणाचें कार्य करीत राहावें, विज्ञान किंवा धर्म पुरविण्याच्या भरीस पडूं नये. (पृ. २–३).

व्यावहारिक तत्त्वज्ञानाच्या विभागांत त्यांची विचार-सरणी त्यांच्या दोन विशिष्ट निबंधांचा उल्लेख करून दर्शवितां येईल : त्यांपैकीं एक निबंध "'हॅपिनेस' विषयीं" ('On Happiness') हा होय. 'हॅपिनेस' याचें मराठींत भाषांतर सर्वमान्य व बिनचूक करणें कठीण आहे. 'हॅपिनेस' म्हणजे 'सुख' नाहीं. कदाचित् 'समाधान' हा शब्द अधिक व्यंजक ठरेल असें वाटतें; परंतु 'सौख्य' हा शब्द ('सुखा'पासूनच साधत असला तरी ) 'हॅपिनेस'चा अर्थ त्याहीपेक्षां अधिक योग्य रीतीनें व्यक्त करू शकेल असें वाटतें. ( 'सौख्यां'त सुख आहे; पण 'सुखा'नेंच 'सौख्य' संपलें असें होत नाहीं. ) आपल्या ग्रंथकर्त्याचा सिद्धान्त असा कीं 'सौख्य' ( Happiness ) हेंच मानवी जीवनाचें नैतिक साध्य होय. या 'सौख्यां'त कशाचा समावेश होतो वा होत नाहीं, व त्याची व्याप्ति काय याची त्यांनीं चर्चा केली आहे. या निबंधांतील त्यांच्या सिद्धांतनाचें स्वरूप व विवेचन पाहिल्यास या त्यांच्या विचारसरणीचें ॲरिस्टॉटलच्या विख्यात 'सौख्यवादा'शीं (Eudaemonismशीं) फार जवळचें नातें दिसतें; पण त्याचा त्यांनीं उल्लेख केलेला नाहीं.—या विभागांतील त्यांचा दुसरा उल्लेखनीय निबंध म्हणजे 'धर्माची आजची गरज' ('The Present Need of Religion') हा होय. त्यांनीं या निबंधांत धार्मिक वृत्ती-( religious attitude )चें विश्लेषण करून तिचे सर्व धर्मांस सामान्य असें मूलभूत घटक कोणते याचें विवेचन केलें आहे. स्थूलपणें म्हटल्यास, विश्व हें मानवाच्या आंतरिक गरजांबद्दल उदासीन नसलें तरी तें मानवापेक्षां अधिक विशाल आहे ही वृत्ति धर्मभावनेचें सार होय असा सिद्धान्त त्यांनीं मांडला आहे. धर्माबद्दल येणारे आक्षेप निवेदन व खंडन करून, विशुद्ध धर्माचें व








त्याच्या मानवी जीवनांतील स्थानाचें त्यांनीं मंडन केलें आहे व धर्मानें नेहमीं प्रगतिशील व सुधारणाक्षम राहिलें पाहिजे आणि आज आपल्या जीवनांत अशा धर्माची जरूरी आहे असें सुचविलें आहे. हें त्यांचें विवेचन ( क्वचित् ठिकाणीं मतभेदाचीं स्थळें असूनहि ) मोठें सरस उतरलें आहे यांत शंका नाहीं.

'भारतीय तत्त्वज्ञाना'चा विभाग सर्वांत लहान आहे. त्यांतील 'भारतीय तत्त्वज्ञानांतील पाखंडें' 'Heresies in Indian Philosophy' हा लेख विशेष उल्लेखनीय होय. या निबंधांत 'चार्वाक-वाद' व 'बौद्धवाद' या तत्त्वमतांविषयीं, तीं सर्वस्वीं स्वीकार्य नसलीं तरी, आपण अधिक गुणग्राहकता बाळगली पाहिजे हा निबंधलेखकाचा मुद्दा आहे. त्यांजवर झालेल्या टीकांबद्दल लेखकानें टीकाकारांस दोष दिला आहे; परंतु ज्या मतांबद्दल ह्या वादांवर ही टीका झाली तीं मतें स्वतः निबंधलेखकांस मान्य आहेत असेंहि दिसत नाहीं.

यापेक्षां अधिक निबंधांचा धांवताहि उल्लेख करावयाचा म्हटल्यास लेख मर्यादेपेक्षां लांबेल. पुस्तकाचें बहिरंग चांगलें आहे. छपाई उत्तमच आहे. ग्रंथांत संपादनकार्याच्या मात्र कांहीं उणीवा आहेत. ग्रंथांत निबंधांचीं मूळ प्रकाशनस्थळें दिलीं असलीं तरी त्यांचे मूळ प्रकाशनाचे किंवा वाचनाचे काळ दिलेले नाहींत. निबंध जसे वेळोंवेळीं वाचले गेले तसेच ते या पुस्तकांत छापल्यानें हे काल देणें इष्ट होतें असें वाटतें. ते दिले असते तर कर्त्याच्या विचार-विकासाच्या दृष्टीनें निबंधांत कांहीं क्रम लावून पहाणें शक्य झालें असतें. ग्रंथास सूचि नाहीं. विरामचिन्हांचे दोष पुष्कळच आहेत, क्वचित् भाषेचेहि. शुद्धिपत्र नाहीं.

एकंदरींत पाहतां हा निबंध-संग्रह त्यांतील विचारांचा ताजेपणा, प्रांजलपणा, विरुद्ध विचारसरणींसंबंधींहि संग्राहक व गुणग्राहक बुद्धि, सुबोध प्रतिपादन इत्यादि आंतरिक गुणांमुळें वाचनीय झाला आहे. याबद्दल मी प्रा. दामले यांचें अभिनंदन करितों व यापुढें अनेक स्फुट निबंधांच्या संग्रहापुढील पायरी म्हणजे एकाद्या विषयासंबंधीं समग्र ग्रंथलेखन – तें त्यांनीं हातीं घ्यावें अशी वाचकांतर्फे त्यांना सूचना करितों.

— दे. द. वाडेकर

---

**इभ्रत** ( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

– लेखक : **श्री. स. शं. देसाई.** प्रकाशक : रामकृष्ण-प्रकाशन-मंडळ, मोरबाग रोड, दादर, मुंबई १४. डिसेंबर १९५३. पानें १४ + १९२. किं. ३॥ रु.

गोव्यांतील खेडेगांवाच्या प्रादेशिक पार्श्वभूमीवर आधारलेल्या प्रस्तुत 'इभ्रत' कादंबरींत एका जुन्या ४००–५०० वर्षांच्या खानदानी मातबर देसाई घराण्याची त्यांतील शेवटच्या वंशजांच्या इभ्रतीच्या कल्पनेमुळ कशी वाताहत झाली याचें हृदय-द्रावक चित्रण आहे. देसायांच्या घराण्यांतील शेवटच्या पिढींतील आपाजी देसाई इभ्रतीसाठीं कर्जबाजारी बनतात. त्यांची मुलगी तुळशी ज्या आकूशेटजीच्या मुलाला दिलेली असते ते आकूशेटजी स्वतःच्या घराण्याचा अपमान झाला म्हणून इभ्रतीखातर तुळशीला ठेवायला तयार नाहींत. आपाजींनीं त्यांच्या "पायांवर डोकीचा रुमाल ठेवून" क्षमा मागितल्याशिवाय आकूशेटजी तुळशीला घरांत घ्यायला तयार नाहींत. पण आपाजी आपल्या इभ्रतीसाठीं असें नाक घासायला तयार नाहींत म्हणून तुळशीला सासर कायमचें अंतरून ती कायमची 'परित्यक्ता' बनते ! आपाजींचा मुलगा दत्ता हा तर दुर्व्यसनी व चंगीभंगी निघाला आहे. म्हणून आपाजींच्या इभ्रतीला तडे जातात. दत्ताजी कितीहि दुर्व्यसनी असला तरी त्यालाहि आपल्या घराण्याच्या इभ्रतीचा अभिमान आहे. गांवची नायकीण काशी आपली शेंस घातलेली स्वरूपसुंदर नात केसर दत्ताकडे पाठवायला तयार होत नाहीं, म्हणून दत्ताला भयंकर अपमान वाटतो व 'ही कोण एवढी महानन्दा लागून गेली आहे ?' या भावनेनें तो इरेला पेटून आपल्या इभ्रतीकरितां काशी नायकिणीच्या घरावर भर रात्रीं केसरला हरण करून नेण्याकरितां चक्क दरोडा घालतो ! आपला मुलगा दुर्व्यसनी असला तरी त्याची नायकिणीच्या घरावर दरोडे घालण्यापर्यंत मजल जावी, हें पाहून आपाजींना मरणप्राय दुःख होतें व आपल्या घराण्याच्या इभ्रतीखातर ते शिकारीला जायचें मिष करून तेथें बंदुकीनें आत्महत्या करून घेतात ! आपाजींच्या घरांतला नोकर कृष्णा हा, आपाजींच्या आदिपूर्वजानें ज्या मूळ जमीनदाराचा नाश करून त्याची जमीन व अधिकार बळकावलेले असतात, त्या जमीनदाराचाच वंशज. त्याच्याहि मनांत आपल्या घराण्याच्या इभ्रतीखातर










कधींतरी सूड उगविण्याचा डंख असतोच. विचारी परित्यक्ता तुळशी ! सासर वर्ज्य, माहेर भकास अशा परिस्थितींत सहानुभूति दाखविणाऱ्या कृष्णाबरोबर पळून जाते. कृष्णा तिला बटीक म्हणून राबवून आपल्या घराण्यावर झालेल्या अन्यायाचा सूड घेतो ! तुळशीचीहि आपल्या घराण्याच्या इभ्रतीची भावना उसळून उठते व ती कुळाच्या प्रतिष्ठेखातर नदींत जीव देते ! या थराला गोष्ट जाईल अशी कृष्णाला कल्पना नसते. तो विचारा शून्यमनस्क बनून आपल्या गांवीं परततो. तुळशीला कृष्णानें पळवून नेली याचा दत्ताला भयंकर अपमान वाटत असतो. त्याचा बदला म्हणून दत्ता घराण्याच्या इभ्रतीकरितां घराण्याला काळिमा आणणाऱ्या कृष्णाला बंदुकीची गोळी घालून ठार मारतो; व पुढें न्यायालयांत गुन्हा कबूल करून जी काळया पाण्याची शिक्षा होते ती तो आनंदानें पतकरतो ! — अशी ही इभ्रतीची शोकान्तिका आहे.

इभ्रतीच्या कल्पनेच्या आहारीं जाऊन, हीं कादंबरींत दाखविलेलीं भलीबुरीं माणसें आपल्या जीवनाची शोकान्तिका करून घेतात, हें दृश्य आधुनिक व्यक्ति-स्वातंत्र्यवादी, बुद्धिवादी वाचकाच्या दृष्टीनें अत्यंत विषादजनक आहे. पण तें दृश्य वस्तुस्थितिदर्शक आहे. ज्या गोव्याच्या प्रादेशिक सामाजिक पार्श्वभूमीवर हें कथानक आधारलेलें आहे, ती पार्श्वभूमि अशीच आहे. आणि हें वास्तवदर्शन हाच या कादंबरीचा उल्लेखनीय विशेष आहे. गोव्याच्या खेडेगांवांतील मागासलेला मध्ययुगीन समाज, शतकानुशतकें चालत आलेल्या रूढी, संकेत, धार्मिक समजुती यांचा दास बनलेला, कुळाला व जातीला प्राधान्य देणारा, उच्च मानल्या गेलेल्या सरंजामशाही कुळांकडे उच्च वागणुकीची व हीन मानल्या गेलेल्या जातींकडे हीन वागणुकीची अशी सामान्यपणें मक्तेदारी सोंपवून ती गंमत स्वस्थपणें पहाणारा, व्यक्तीला कांहींहि स्वतंत्र मूल्य नाहीं, तिनें परंपरागत कुळाचार पाळले पाहिजेत नाहींतर प्रारब्धाचा भोग भोगला पाहिजे अशी प्रामाणिक समजूत बाळ-गणारा असा हा समाज भारतांतील अगदीं शहरी संस्कृतीपासून दूर अशा कांहीं भागांतील ग्रामीण जीवना-चें प्रतीक आहे. अशा समाजाला व्यक्तींनीं कुळाच्या इभ्रतीखातर बळी जाणें हें अगदीं नैसर्गिक वाटतें. किंबहुना कुळाचाराचा व प्रारब्धाचा तो एक निसर्ग-नियमाप्रमाणें दुर्निवार, अटळ असा परिणाम आहे अशी त्या समाजाची बालंबाल खात्री असते. अशा समाजाच्या मनःपिंडाविषयीं सहानुभूति उत्पन्न होऊन वाचक त्याशीं समरस होईल इतक्या कुशलतेनें व तन्मयतेनें प्रस्तुत कादंबरींत कादंबरीकारानें समाजमनाचें निरनिराळया व्यक्तिरेखांच्या द्वारें चित्रण केलें आहे. कादंबरीकारानें चित्रित केलेल्या व्यक्तिरेखा, त्याची वर्णनशैली व भाषा-शैली ह्या इतक्या स्वाभाविक व अकृत्रिम आहेत कीं कादंबरीची पार्श्वभूमि असलेल्या ग्रामीण जीवनाशीं लेखक समरसून गेला आहे याची त्यावरून साक्ष पटते. कादंबरी वाचून खालीं ठेवतांना त्यांतील बळी गेलेल्या व्यक्तींचा शोककारक अंत बघून जरी मन विषण्ण होत असलें, तरी त्या गांवच्या विशिष्ट वातावरणांत, त्या विशिष्ट मध्ययुगीन घडण असलेल्या सामाजिक मनाच्या सांच्यांत ही कठोर परिणति अपरिहार्यच आहे, असें वाटून जातें. आणि हेंच या कादंबरीच्या उच्च गुणवत्तेचें द्योतक होय.

— वि. म. बेडेकर.

---





अनुक्रमणिका






